# प्रास्ताविक



मानसिक संशोधनाचे कामीं तुकारामानें मला पुष्कळ मदत केली आहे. माझ्या आईच्या मधुर कंठांतून तुकारामाचे अभंग मीं ऐकले आहेत. त्याच्या स्मरणानें हि आज माझे डोळे ओले होतात. तुकारामांतून माझ्या आवडीचे शंभर-एक अभंग निवडून किंचित् विवरणासह वाचकांपुढें ठेवावे अशी एक योजना माझ्या मनांत होती. 'महाराष्ट्र-धर्म' साप्ताहिकाच्या दरएक अंकांत असा एकेक अभंग मी देत असें. त्यांचा हा छोटासा संग्रह आहे. ही योजना पूर्ण झालेली नाहीं. पण झाली तेवढी हि उपयोगाची समजून प्रकाशित केली आहे. अनेकांना ती आवडली आहे. सेवकांच्या जीवन-शुद्धीला तिचें साह्य होवो.

गोपुरी, नालवाडी<br>
२७ जुलै, १९४५

विनोबा

# अनुक्रमणिका


| अभंग | पृष्ठ |
|---|---|
| १ तीळ जाळिले तांदूळ | १ |
| २ अवघीं भूतें साम्या आलीं | २ |
| ३ अमर आहों अमर | ४ |
| १४ भाव तैसें फळ | ६ |
| ५ आपुला विचार करीन | ९ |
| ६ ऐसें भाग्य कई लाहता | १२ |
| ७ नको सांडूं अन्न | १५ |
| ८ लवविले तयासवें | १८ |
| ९ घेई घेई माझे वाचे | २३ |
| १० मुनि मुक्त झाले | २६ |
| ११ मनवाचातीत तुझें | ३० |
| १२ सर्वस्वाचा त्याग | ३३ |
| १३ मायबाप करिती चिंता | ३६ |
| ४ झाला प्रेतरूप | ४० |
| १५ तूं माउलीहूनि | ४३ |
| १६ वीज भाजुनि केली लाही | ४७ |
| १७ कृपेचीं उत्तरें देवाचा | ५० |
| १८ निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें | ५३ |
| १९ आम्ही सदैव सुडके | ५५ |
| २० आम्हां-घरीं एक गाय | ५८ |
| २१ यातिहीन मज काय | ६१ |
| २२ अवघ्या वाटा झाल्या | ६४ |
| २३ कृपाळु म्हणोनि बोलती | ६७ |
| २४ आम्ही वैकुंठवासी | ६९ |
| २५ उपकारी असें आरोनि | ७२ |
| २६ जाणोनि नेणतें करीं | ७५ |
| २७ भूतीं देव म्हणोनि | ७८ |
| २८ माझे तों स्वभाव | ८१ |
| २९ तुजऐसा कोणी | ८४ |
| ३० भक्तांहूनि देवा | ८८ |
| ३१ पवित्र होईन चरित्र | ९२ |
| ३२ कोणाच्या आधारें | ९६ |
| ३३ नाम-संकीर्तन | ९९ |
| ३४ पराविया नारी | १०३ |
| ३५ माझ्या विठोबाचा | १०६ |

# संतांचा प्रसाद

[१]

तीळ जाळिले तांदूळ । काम क्रोध तैसे चि खळ ॥ १ ॥
कां रे सिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥ २ ॥
मान दंभ पोटासाठीं । केली अक्षरांची आटी ॥ ३ ॥
तप करूनि तीर्थाटण । वाढविला अभिमान ॥ ४ ॥
वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ५ ॥
तुका म्हणे चुकलें वर्म । केला अवघा चि अधर्म ॥ ६ ॥

भक्तीच्या अभावीं धर्माला दंभाचें स्वरूप येतें हें ह्या अभंगांत सुचविलें आहे.

श्रुतीच्या एका वचनांत (१) वेदांचें अध्ययन (२) यज्ञ (३) दान आणि (४) तप, हीं ईश्वरप्राप्तीचीं साधनें सांगितलीं आहेत. तें वचन असें—

**तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसा ।**

ह्या चारी साधनांचा उल्लेख करून तीं सर्व मुख्य वर्म चुकल्यानें व्यर्थ होतात असें ह्या अभंगांत दाखविलें आहे.

हा च अर्थ खालील श्लोकांत आलेला आहे—

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**

**भावार्थ—माझें दर्शन केवळ वेदाभ्यासानें, तपानें, दानानें किंवा यज्ञानें होईल ही आशा फुकट आहे.**

## [२]

**अवघीं भूतें साम्या आलीं। देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥**
**विश्वास तो खरा मग । पांडुरंग-कृपेचा ॥ २ ॥**
**माझी कोणी न धरू शंका। ऐसें हो कां निर्द्वंद्व ॥ ३ ॥**
**तुका म्हणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ४ ॥**

सर्व भूतें एकरूप आहेत असें माझ्या डोळ्याला केव्हां दिसेल? जेव्हां दिसेल तेव्हां च माझ्यावर पांडुरंगाची कृपा झाली असें मी निश्चित समजेन. माझी अशी द्वंद्वरहित स्थिति झाली पाहिजे कीं ज्यायोगानें माझ्याविषयीं कोणाला हि जरासुद्धां भय किंवा शंका वाटूं नये. तुकाराम महाराज म्हणतात, जी जी वस्तु दिसेल ती ती माझें च रूप आहे असें वाटलें पाहिजे.

ह्या अभंगांत महाराजांनीं दोन मुद्दे मांडले आहेत—

(१) सर्व भूतांचे ठायीं साम्य दिसूं लागणें हा च ईश्वर-दर्शनाचा अर्थ समजावयाचा.

गीता हि असें च म्हणते,

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥**

**भावार्थ—ज्यांचें मन साम्यांत स्थिर आहे ते ब्रह्मांत स्थिर आहेत. कारण निर्दोष साम्य हें च ब्रह्माचें स्वरूप आहे.**

आणि

(२) सर्व भूतांचे ठायीं मला संपूर्ण साम्य दिसूं लागलें असें मीं विश्वासपूर्वक तेव्हां च समजावें जेव्हां सर्व भूतें माझ्याविषयीं निःशंक किंवा निर्भय बनतील.

हा च भाव गीतेच्या भक्त-लक्षणांत सांगितला आहे—

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः।**

एकदां महाराज ज्ञानोबांच्या दर्शनासाठीं आळंदीस जात असतां वाटेंत एका झाडाखालीं पक्षी दाणे टिपीत होते ते त्यांना पाहून उडाले. पक्षी उडालेले पाहून महाराजांना फार खेद वाटला. त्या वेळीं त्यांच्या तोंडांतून निघालेला हा अभंग आहे. पुढें महाराज त्या ठिकाणीं अंग न हालवितां, श्वासोच्छ्वास स्थिर करून, अंतःकरणांत सर्वान्तर्यामी परमेश्वराचें स्मरण करीत, चार घटका एखाद्या खांबासारखे उभे राहिले. पक्षी माझ्याविषयीं निर्भय झाल्याशिवाय मी येथून हालणार नाहीं असा त्यांचा निश्चय होता. शेंवटीं चार घटका उभे राहिल्यावर सर्व पक्षी महाराजांचा प्रेममय विश्वात्मभाव ओळखून त्यांच्या खांद्यावर येऊन बसले आणि एखाद्या झाडावर जसे निर्भयपणें खेळतात तसे खेळूं लागले. पुढें महाराज हि भजनाच्या भरांत झाडासारखे डोलूं लागले, तरी ते पक्षी उडून गेले नाहींत. तेव्हां महाराजांचें समाधान होऊन ते तेथून हालले!

## [३]

**अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हें ॥ १ ॥**
**न म्हणा देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ॥ २ ॥**
**कैंचा धाक कैंचा धाक । सकळिक हें आपुलें ॥ ३ ॥**
**देव चि बरे देव चि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ॥ ४ ॥**

मी पुनः पुनः सांगतों कीं तुम्ही अमर आहां. माझें म्हणणें खरें कीं खोटें हें तुम्ही च आपल्या ठिकाणीं तपासून पहा. मात्र 'देह माझा' ही कल्पना बाजूस सारून तपास करा, म्हणजे माझ्या म्हणण्याचा भरंवसा पटेल. अरे, डर कसला? हें सगळें आपलें च आहे ना? मग डर कसला? तुकाराम महाराज म्हणतात, खरोखर तुम्ही देवाच्या सुंदर मूर्ति आहांत.

ह्यांतील विचारांतला तर्क असा—

(१) मी अमर आहें,

(२) कारण, मी देवाचें च रूप आहें.

(३) हा अनुभव मला येत नाहीं ह्याचें कारण माझी देहाविषयींची आंधळी ममता होय.

(४) ती सोडून दिल्यास माझें देवत्व मला प्रत्यक्ष दिसेल,

(५) आणि सर्व दुनिया माझी च होईल.

(६) मग भयाला कारण कोणचें उरलें?

भयाचीं कारणें दोन. (१) मी मरणारा आहें असें वाटणें, आणि (२) दुनिया दुश्मन असून जणूं मारायला टपली आहे असें वाटणें. ह्या दोन्ही कल्पनांचें मूळ कारण एक च, माझी देहांधता. देहांधतेमुळें एका

बाजूनें माझें देवरूप मी गमावून बसलों, आणि दुसऱ्या बाजूनें विश्वरूप गमावून बसलों. देवरूप गमावल्यामुळें मरतुकडा बनलों, विश्वरूप गमावल्यामुळें दुनिया दुश्मन झाली.

देहबुद्धीमध्यें दोन दोष आहेत : (१) बहिर्मुखता, आणि (२) संकुचितता. बहिर्मुखतेमुळें आंतला देव अंतरला, संकुचिततेमुळें दुनिया दूर झाली. आणि ह्या दुहेरी द्वैतामुळें मी भयभीत झालों.

खालील वचनें ह्या च अर्थाचीं—

**(१) द्वितीयात् वै भयं भवति । —श्रुति**

**(२) भयं द्वितीयाभिनिवेशतः स्यात् । —भागवत**

**अर्थ—दुजेपणामुळें भय वाटतें.**

संतांची वीर्यवती वाणी भयभीताला निर्भय करो.

---

*

[४]

**भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥**
**धावें जातीपाशीं जाती । खूण येरयेरां चित्तीं ॥ २ ॥**
**हिरा हिरकणी । काढी आंतूनि ऐरणी ॥ ३ ॥**
**तुका म्हणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥ ४ ॥**

जसा आपला भाव तसें फळ आपल्याला देव देतो. देवापाशीं बळ चालत नाहीं. ज्या जातीचा 'मी' त्या च जातीचा 'तो' मला भेटतो, ह्याची खूण त्याला हि पटते आणि मला हि पटते. हिरा-हिरकणीचा दाखला लोक देतात त्याचा हा च अर्थ आहे. हिऱ्याची पारख करण्यासाठीं त्याला ऐरणीवर ठेवून घणांनीं मारतात. पण तो खरा हिरा असल्यास न फुटतां ऐरणींत घुसून बसतो. त्याला बाहेर काढण्यासाठीं हिरकणी त्याच्याजवळ नेतात. म्हणजे तिच्या आकर्षणानें तो बाहेर निघतो. ती त्याला कां बाहेर खेंचूं शकते? कारण ती त्याच्या च जातीची असते. तसें माझें 'स्वरूप' ज्या जातीचें त्या जातीचें 'विश्वरूप' मी खेंचून घेतों. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, आपण आपलें मन पुनः पुनः तपासून शुद्ध करीत असावें हें चांगलें.

ह्या अभंगांत सांगितलेला देवाचा कायदा

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

ह्या गीतेंतील वचनावरून घेतला आहे. पण तो कायदा लागू कसा करावयाचा हें ह्यांत विशेष सांगितलें आहे.

माझा देव किंवा माझ्या आसपासची दुनिया हें माझ्या मनाचें च प्रतिबिंब आहे म्हणून—

(१) हें प्रतिबिंब जसें असावें असें मी इच्छितों तसें माझें बिंब मला राखलें पाहिजे. लोकांनीं माझ्याशीं प्रेमानें वागावें अशी च स्वाभाविकपणें माझी इच्छा असणार. म्हणून मला माझें मन प्रेमळ राखलें पाहिजे. आणि

(२) हें प्रतिबिंब जर वाईट पडलें असेल तर तो वाईटपणा मला माझ्या बिंबांत पाहिला पाहिजे. म्हणजे दुसरा जर माझ्याशीं दुर्जनपणानें वागत असेल तर माझ्या मनांत ह्या दुर्जनपणाचें बीज मीं तपासलें पाहिजे. आणि तपासून माझें मन मीं शुद्ध केलें पाहिजे.

ही आत्मपरीक्षणाची वृत्ति तुकाराम महाराजांच्या अंगीं संपूर्ण बाणलेली होती. खालील गोष्टींत तिचें सुंदर दर्शन होतें.

महाराजांनीं आपल्या वांट्याचीं खतपत्रें इंद्रायणींत बुडविलीं तेव्हां-पासून ते मजुरी करून राहूं लागले. मोडकेंसें खोपट आणि त्यांत चार दोन मडकीं हा मुख्य संग्रह. कण्या रांधाव्या आणि दाट-पातळ कसा तरी काळ सारावा. पण ह्या आदर्श गरिबीला एक च गालबोट लागलें होतें. महाराजांचे सासरे अप्पाजी गुळवे सावकार ह्यांनीं आपल्या लेकीला एक दुभती म्हैस दिली होती. महाराज तिचें दूध तिच्या वासराला पोटभर पाजीत आणि उरलेलें थोडें घरांत वापरीत असत. एकदां नित्याप्रमाणें महाराज रात्रीं देवळांत कीर्तन करीत असतां घरांत चोर आले आणि त्यांनीं तेवढी म्हैस पळवली. गांवाच्या बाहेर बरे च दूर गेल्यानंतर त्या चोराच्या हृदयांतल्या देवानें विकराळ रूप धारण केलें, आणि एक भला मोठा टोणपा हातांत घेऊन तो त्यांना मारूं लागला. चोर घाबरून गयावया करूं लागले. पण तो कांहीं सोडी च ना. तेव्हां त्यांनीं परत जाऊन ती म्हैस झोंपडींत जेथल्या तेथें बांधली, आणि तेथून ते आल्या वाटेनें पळत सुटले. पण त्या अंतर्यामी देवानें त्यांचा पिच्छा सोडला नाहीं. तो म्हणाला, "तुम्हांला अनुताप झाला एवढें बस नाहीं. गुन्हा जाहीर झाला

पाहिजे. तुम्ही देवळांत जा, आणि महाराजांना सर्व सांगून त्यांची माफी मागा." देवाचा शब्द ऐकून ते भीत भीत देवळांत आले. इकडे 'ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं' हा रंग माजला होता. कीर्तन संपेपर्यंत ते तेथें च बसले. शेंवटीं सगळी हकीकत महाराजांना जशीच्या तशी सांगून टाकली. महाराजांनीं "तुम्हांला गरज असेल तर ती म्हैस तुम्ही अवश्य घेऊन जा. ती म्हैस आजपर्यंत मीं माझी मानलेली च नाहीं," वगैरे पुष्कळ सांगून पाहिलें. पण त्यांनीं तें कबूल केलें नाहीं. पुढें महाराज घरीं आले. "चोर माझ्याकडे कां आले? मागून त्यांना पश्चात्ताप वाटला हें ठीक आहे. पण त्यांना माझ्या घरीं चोरी करण्याची मूळ प्रेरणा च कशी झाली? 'धांवे जातीपाशीं जाती' मी चोर असल्याशिवाय माझ्याकडे चोर येणें शक्य नाहीं" असें त्यांनीं पुष्कळ आत्ममंथन केलें. आणि दुसऱ्या दिवसापासून त्या म्हशीचें दूध घरीं न वापरतां गांवांतल्या कोणातरी गरिबाच्या मुलाला द्यावें असा रिवाज सुरू झाला.

---

[५]

आपुला विचार करीन जीवाशीं ।
काय या जनांशीं चाड मज ॥ १ ॥
आपुलें स्वहित जाणती सकळ ।
निरोधितां बळें दुःख वाटे ॥ २ ॥
आइको नाइको कथा कोणी तरी ।
जाऊनियां घरीं निजो सुखें ॥ ३ ॥
माझी कोण वोज झाला हा शेंवट ।
देखोनियां वाट आणिकां लागे ॥ ४ ॥
तुका म्हणे भाकूं आपुली करुणा ।
जयाची वासना तया फळे ॥ ५ ॥

माझ्या जीवाचा मीं शोध घ्यावा, ह्यांत च माझें आणि जगाचें कल्याण आहे. त्याच्याऐवजीं जगाची उठाठेव करण्यापासून काय फायदा? ज्याला त्याला आपआपलें हित समजत च असतें. अशा स्थितींत दुसऱ्याच्या जुलमानें काय होणार? क्लेश तेवढा उत्पन्न होणार. कथा ऐकावी, कीं झोंप काढावी, हें ज्याचें त्याला स्वातंत्र्य असलें च पाहिजे. बरें मीं असा तर विचार केला पाहिजे कीं माझा काय एवढा चांगला शेंवट झाला आहे कीं माझें उदाहरण लोकांना लागेल? म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या त्याच्या वासनेप्रमाणें ज्याला त्याला फळ मिळत असतें, ही गोष्ट लक्षांत घेऊन मीं माझी स्वतःची कींव करावी हें च चांगलें.

एकदां तुकाराम महाराज कीर्तन करीत असतां एकामागून एक सर्व श्रोत्यांनीं घरची वाट धरली. त्या वेळीं भूतदयेनें भरलेल्या महाराजांच्या कोमल मनाला अतिशय विषाद वाटला. त्या प्रसंगाचा हा अभंग आहे.

ह्या अभंगांत जग सुधारण्याच्या नादीं लागल्यानें काय काय दुष्परिणाम होतात तें दाखविलें आहे—

(१) मनुष्याची आत्मपरीक्षणाची वृत्ति सुटते. 'आपला विचार' करण्यास अवकाश राहत नाहीं.

(२) त्यामुळें स्वतःच्या दुःस्थितीविषयीं कींव वाटेनाशी होते.

(३) माझा शेंवट मला लवकर च गांठला पाहिजे ही तळमळ नाहींशी होऊन प्रयत्न ढिला पडतो.

(४) आणि असें झालें म्हणजे लोकोद्धाराचा हि जो एक च एक उपाय—आत्मोद्धार—तो हातचा जातो.

(५) जगाविषयींची आसक्ति ('चाड') उत्तरोत्तर वाढत जाते.

(६) ज्याला त्याला आपआपल्या हिताची जाणीव थोडी-बहुत असते च ह्याचें स्मरण राहत नाहीं. आत्म-संभावित-वृत्ति उत्पन्न होऊन लोकांविषयीं अनादर वाटूं लागतो.

(७) प्रत्येक मनुष्य विशिष्ट वासना किंवा वळण घेऊन आलेला असतो, आणि त्याप्रमाणें त्याला गति मिळत असते, ह्या प्रकृतीच्या कायद्याकडे दुर्लक्ष होतें.

(८) व्यक्ति-स्वातंत्र्याची मर्यादा राखली जात नाहीं.

(९) जुलमानें निग्रह करण्याकडे प्रवृत्ति होते.

(१०) त्यानें जग सुधारण्याचा इष्ट हेतु तर सफळ होत नाहीं च, पण उभयपक्षीं क्लेश वाढतो.

ह्या शिवाय आणखी एक महत्त्वाचा मुद्दा ह्या अभंगांत सुचविला आहे. तो हा कीं माझें पाहून लोकांना 'वाट लागावी' अशी अपेक्षा करण्याला माझा मीं 'शेंवट' गांठलेला असला पाहिजे.

ह्या अभंगाबरोबर खालील वचनें मननीय आहेत—

(१) **प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ।** —गीता

अर्थ—प्राणिमात्र प्रकृतीला अनुसरून वागत असतात. तिथें भलत्याचा निग्रह काय कामाचा ?

(२) **उद्धरेदात्मनाऽऽत्मानम् ।** —गीता

अर्थ—आत्मबलानें आत्म्याचा उद्धार करावा.

(३) **मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ।** —गीता

अर्थ—सर्व माणसें आपआपल्या परी माझ्या च कडे येण्याचा प्रयत्न करीत असतात.

(४) **किं प्रजया करिष्यामः ।** —श्रुति

अर्थ—'काय जनांसवें चाड मज ।'

---

[६]

**ऐसें भाग्य कई लाहता होईन । अवघे देखें जन ब्रह्मरूप ॥ १ ॥**
**मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती ॥ २ ॥**
**शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिकां ॥ ३ ॥**
**विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगीत ज्वाळ अग्नि जैसा ॥ ४ ॥**
**भक्ति नवविधा भाव-शुद्ध बरी । अलंकारावरी मुगुटमणि ॥ ५ ॥**
**तुका म्हणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥ ६ ॥**

सर्व जग ब्रह्मरूप दिसूं लागावें एवढें भाग्य मला कधीं लाभेल? मग माझ्या सुखाला कांहीं पार राहणार नाहीं. हृदयसमुद्रांत आनंदाच्या लाटा उसळतील. पण हें भाग्य केव्हां लाभेल? जेव्हां दया, क्षमा, शांति वगैरे दैवी संपत्तीचे गुण माझ्या अंगीं मूर्तिमंत जागतील, जेव्हां कामक्रोध-लोभादि आसुरी संपत्तीपासून मी सर्वथा परावृत्त होईन, जेव्हां धगधगीत आणि उज्ज्वल अशा अग्नीप्रमाणें माझ्या ठिकाणीं विवेकयुक्त वैराग्य पेटेल, जेव्हां सर्व साधनांच्या डोक्यावर भावशुद्ध भक्तीचा उदय होईल, तेव्हां हें भाग्य लाभण्याची आशा राखावी. तुकाराम-महाराज म्हणतात, माझी ही वासना पुरविणारा, हे नारायणा, तुझ्याशिवाय कोण आहे?

(१) सर्व ब्रह्ममय आहे असें दर्शन होणें ही वस्तु अत्यंत दुर्लभ आहे. अनेक जन्मांअंतीं प्राप्त होणारी आहे असें गीता हि म्हणते—

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥**

(२) असें दर्शन होणें हा शेवटचा आनंद आहे—

**एषोऽस्य परम आनंदः । —श्रुति**

**अर्थ—हा च मनुष्याला प्राप्त होणारा अखेरचा आनंद होय.**

**एतस्यैव आनन्दस्य अन्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति । —श्रुति**

**अर्थ—ह्या आनंदाच्या एका अल्पशा अंशावर सारी दुनिया झुलून राहिली आहे.**

विश्वात्मभावाचा अनुभव घेणारा ऋषि वामदेव वेदांत म्हणतो—

**समुद्रादूर्मिर्मधुमानुदारत् ।**

**अर्थ—माझ्या हृदयसमुद्रांत अमृताच्या लहरी उसळूं लागल्या आहेत !**

(३) ह्याला उपाय तीनः—(अ) सद्‌गुण-विकास, (आ) विवेक-वैराग्य, आणि (इ) भावशुद्ध भक्ति.

(अ) सद्‌गुण-विकास म्हणजे गीतेच्या १६ व्या अध्यायांत सांगितलेल्या दैवी संपत्तीच्या गुणांचा विकास. 'शांति क्षमा आणि दया' हें दैवी संपत्तीला तुकाराम महाराजांनीं दिलेलें अतिसंक्षेपरूप आहे—

**'दया क्षमा शांति । तेथें देवाची वसति ॥'**
**'दया क्षमा शांति । बाण अभंग हे हातीं ॥'**

सद्‌गुणविकासाचें च दुर्गुणांपासून—म्हणजे गीतेच्या १६ व्या अध्यायांतील आसुरी संपत्तीपासून—परावृत्त होणें हें निवर्तक अंग आहे. ह्या आसुरी संपत्तीला भगवंतांनीं च खालील श्लोकांत संक्षेपरूप दिलें आहे.

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥**

**अर्थ—काम क्रोध आणि लोभ हीं नरकाचीं द्वारें आहेत, ह्यांचा त्याग करावा.**

(आ) विवेकयुक्त वैराग्य पाहिजे. अग्नींत प्रकाश आणि उष्णता हे दोन धर्म एकवटलेले आहेत. विवेकांत प्रकाश ('ज्वाळ') आहे. वैराग्यांत उष्णता ('धग') आहे. म्हणून विवेकयुक्त वैराग्याला धगधगीत आणि उज्ज्वल अशा अग्नीची उपमा दिली.

**विवेक आणि वैराग्य । तें चि जाणावें महद्भाग्य ॥ —समर्थ**

(३) भावशुद्ध भक्ति.

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥**

ही नवविधा भक्ति प्रसिद्ध च आहे. भक्तीला पुनः ‘भाव-शुद्ध’ हें विशेपण जोडण्याची जरूर भासावी हें दुर्दैव आहे. पण भक्तीचा हि ‘संप्रदाय’ बनल्यामुळें त्यांत दंभ दाखल होणें अपरिहार्य आहे. म्हणून ‘भाव-शुद्ध’ म्हणजे खऱ्या जिव्हाळ्याची भक्ति पाहिजे असें म्हणावें लागलें. भक्ति नवविधा म्हणजे ‘नऊ च’ प्रकारची असली पाहिजे असा कायदा नाहीं. नवविधा म्हणजे अनेक प्रकारची, नवीन नवीन उमाळ्यांनीं प्रगट होणारी, असा भाव आहे.

(४) पण हें सर्व झालें तरी अखेरचा आधार नारायणावर च आहे. म्हणून शेंवटीं त्याला च शरण गेलें पाहिजे.

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥ —गीता**

---

[७]

नको सांडूं अन्न नको सेवूं वन
चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥
मातेचिये खांदीं बाळ नेणे भीण
भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ २ ॥
नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं
लावुनी सरे अंगीं देवाचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां
उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ४ ॥

अन्न सोडूं नको किंवा जंगल हि गांठूं नको. नारायणाचें चिंतन कर, आणि जें जें नशिबाला येईल तें भोगून टाक. आईचा आसरा असतांना बाळाला कसला बागुलबोवा? आपण अलग पडलों आहोंत ही भावना च खोडून टाकली पाहिजे. भोगांत गुंतूं नको आणि त्यागाच्या हि भरीस पडूं नको. सगळें गांठोडें देवाच्या खुंटीवर टांगून मोकळा हो कसा! तुकाराम महाराज म्हणतात, आतां पुन्हां कांहीं पुसूं नको. माझ्यापाशीं दुसरा उपदेश करायचा कांहीं उरला नाहीं.

तुकाराम महाराजांच्या साधुत्वाची ख्याति चहूंकडे पसरली, तेव्हां पुष्कळ लोक त्यांच्यापाशीं उपदेश मागण्यासाठीं येऊं लागले. त्या सर्वांना ह्या अभंगांत एक कायमचा उपदेश सांगून टाकला आहे.

(१) बाहेरून त्याग करण्याच्या भरीस पडूं नको. तसें करण्यांत भोग येऊन चिकटतात. वरून वरून इंद्रियें आवरलीं म्हणजे मनानें विषयांचें अधिक च स्मरण होऊं लागतें. ह्याला च भगवंतांनीं ‘मिथ्याचार’ म्हटलें आहे—

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इन्द्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ —गीता**

**त्यागें भोग माझ्या येतील अंतरा ।**
**मग मी दातारा काय करूं ॥ —तुकाराम**

(२) म्हणून कर्तव्य-भावनेनें प्राप्त भोग भोगून टाक. पण गुंतूं नकोस. अनासक्त रहा.

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ —गीता**

**अर्थ—मनानें इंद्रियें आवरून अनासक्त वृत्तीनें कर्मयोगाचें आचरण करीत रहावें हें च विशेष आहे.**

(३) त्याग आणि भोग ह्यांची ही गुंतागुंत देवावर सोंपवून दे, म्हणजे तूं सुटलास. त्याग आणि भोग ह्यांची पक्की निरगांठ बसली आहे.

(अ) आसक्त पुरुषानें बाह्यात्कारीं त्याग केला तरी तो भोगाचा भोग होऊन बसतो. उलट, विरक्त पुरुष बाहेरून विषयांत वागत असला तरी तो भोग म्हणजे 'त्यागाचा त्याग' ठरतो.

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान् मनुष्येषु.....॥ —गीता**

**अर्थ—कर्मांत अकर्म आणि अकर्मांत कर्म पाहतां येणें हें बुद्धिमान् पुरुषाचें लक्षण आहे.**

**भोगें घडे त्याग । त्यागें अंगा येती भोग ॥**
**ऐसें उफराटें वर्म । धर्मा अंगीं च अधर्म ॥ —तुकाराम**

(आ) आसक्त पुरुष वरून वरून मोठा भोग भोगत आहे असें दिसलें तरी त्याच्या मनांत आनंदाचा लेश हि नसतो. म्हणजे तो आपल्या 'भोगाचा त्याग' करून बसला असें च होतें. उलट विरक्त पुरुषानें बाह्यात्कारीं त्याग केला असें दिसत असलें तरी आंत आनंदाच्या लाटा उसळत असतात. म्हणून त्यानें आपल्या 'त्यागाचा भोग' बनविला असें ठरतें.

**त्यज धर्ममधर्मं च उभे सत्यानृते त्यज ।**
**उभे सत्यानृते त्यक्त्वा येन त्यजसि तत् त्यज ॥** —महाभारत

**अर्थ—धर्म सोड, अधर्म सोड, ब्रह्म सोड, जग सोड आणि ज्याच्या योगानें हें सर्व सोडशील तें हि सोड च !**

अशी ही सोडचिट्ठीची भानगड आहे. ती सारी देवावर सोंपवून मोकळा हो.

**चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥** —तुकाराम

(४) देव मेला नाहीं. तुझ्या पाठीशीं उभा आहे. मी एकटा पडलों आहें, आईबाप मरून पोरका झालों आहें, असल्या अनाथ भावनेनें बावरल्यासारखें रान धरूं नकोस.

**हरीचिया दासा नाहीं भय चिंता ।** —तुकाराम
**भवाच्या भयें काय भीतोसि लंडी ।** —समर्थ

'परिव्राजक' म्हणजे सैरावैरा धावत सुटणारा असा अर्थ नाहीं. ईश्वराला शरण जाणारा तो 'परिव्राजक' असा अर्थ गीतेनें सांगितला आहे—

**सर्वधर्मान् 'परि' त्यज्य मामेकं शरणं 'व्रज' ।**

"परि" म्हणजे "परित्यज्य"—सर्व भानगड सोडून, "व्राजक" म्हणजे एका ईश्वराला शरण गेलेला, तो "परिव्राजक" हा अर्थ ध्यानांत ठेव. जा आतां.

**तुका म्हणे पुसों नको वेळोवेळां ।**
**उपदेश वेगळा उरला नाहीं ॥**

**एतदेवाहं ब्रह्म वेद, नातः परमस्तीति ।** —प्रश्नोपनिषत्

**अर्थ—एवढें च ब्रह्म मला समजतें. ह्याहून अधिक कांहीं नाहीं.**

**एतावदरे खलु अमृतत्वमिति ।** —बृहदारण्यक

**अर्थ—मोक्षसाधन एवढें च.**

---

[८]

लवविले तयासवें लवे जाती ।
अभिमानाहातीं सांपडेना ॥ १ ॥
भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे ।
तेथें भाव दुजे हारपती ॥ २ ॥
अर्चन वंदन नवविधा भक्ति ।
दया क्षमा शांति तये ठायीं ॥ ३ ॥
तये गांवीं नाहीं दुःखाची वसति ।
अवघां चि भूतीं नारायण ॥ ४ ॥
अवघें चि झालें सोंवळें ब्रह्मांड ।
विटाळाचें तोंड न देखती ॥ ५ ॥
तुका म्हणे गाजे वैकुंठीं सोहळा ।
या हि भूमंडळामाजीं कीर्ति ॥ ६ ॥

जो जसा लवविणारा भेटेल तसे त्याच्यापुढें विष्णुदास लवतात. त्यांचें मन अभिमानाला कधीं च वश होत नाहीं. भोळेपणाचा अलंकार त्यांना शोभतो. कारण परकेपणाचा भाव त्यांचा हरवलेला असतो. अर्चन, वंदन, वगैरे भक्तीचे नवीन नवीन प्रकार करण्यांत ते दंग असतात. आणि दया क्षमा शांति त्यांच्या ठिकाणीं बिंबलेली असते. दुःख तर त्यांच्या गांवीं हि नसतें. ते सर्वांभूतीं नारायण पाहतात. म्हणून सर्व जग त्यांना पवित्र वाटतें. विटाळाचें त्यांना नांव च माहीत नाहीं. तुकाराम महाराज म्हणतात, अशा भगवद्भक्तांचे वैकुंठांत तर नेहमीं च उत्सव चाललेले असतात. पण त्यांच्यामागें ह्या लोकांत हि त्यांची कीर्ति काम करीत असते.

(१) विष्णुदास सर्वांपुढें लवतात. लवचिकपणामध्यें तणावाची शक्ति आहे आणि जिंकण्याची कला आहे—

**नीचपण बरवें देवा । न चले कोणाचा हि हेवा ॥ १ ॥**
**महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे वांचती ॥ २ ॥**
**येती सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥ ३ ॥**
**तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥**

वेदामध्यें 'सहते' ह्या धातूचे दोन अर्थ आहेत: (१) सहन करणें, आणि (२) जिंकणें. जो सहन करतो तो च जिंकतो, हा ऋषींचा अनुभव त्यांत दिसून येतो. समोरचा मनुष्य लववील तितकें लवण्यांत शौर्याची पराकाष्ठा आहे. ह्या लवण्याच्या हिमतीपुढें देव सुद्धां हार खातो—

**'नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥**
**हें चि शूरत्वाचें अंग । हारी आणिला श्रीरंग ॥'** —तुकाराम

**'जें जगा धाकुटें होइजे । तें जवळीक माझी ॥'** —ज्ञानदेव

(२) विष्णुदास अभिमानाच्या हातीं सांपडत नाहींत. म्हणून त्यांचा कधीं च मानभंग होऊं शकत नाहीं. करंट्याला अभिमानाचा गुलाम बनून आपला मानभंग करून घेण्याची अमंगळ संवय लागलेली असते—

**मान इच्छी तो अपमान पावे ।**
**अमंगळ सवे अभाग्याची ॥** —तुकाराम

महाराजांच्या ठिकाणीं निरभिमानतेचा उत्कर्ष झालेला होता. ह्याविषयीं अनेक गोष्टी आहेत. त्यांतली एक आज पाहूं.

एकदां कोणसा एक ब्राह्मण वेद-व्युत्पत्ति शिकण्यासाठीं मेहनत करीत होता. पण त्याच्या जड जिभेवर कांहीं केल्या अक्षरें बसेचनात. त्याला वाटलें पंढरपूरला जावें, म्हणजे पांडुरंगाच्या कृपेनें विद्या येईल. विटेवरच्या ठोंब्याला विद्येचें वावडें असणार ह्याची त्या बिचाऱ्याला

कल्पना आली नाहीं. तो आपला पंढरपूरला गेला आणि देवाच्या पायांशीं अक्षरें घोकीत बसला. पण तीं अक्षरें उमटलीं नाहींत च. मात्र पंढरपूरच्या भक्तिसंप्रदायाची त्याला तिथें बरी च माहिती मिळाली. त्यावरून त्याच्या लक्षांत आलें कीं ह्या संप्रदायांत बहुतेक टोणप्यांचा च भरणा आहे. त्यांतल्या त्यांत नाहीं म्हणायला ज्ञानोबा आणि नाथ ह्यांचा काय तो अपवाद आहे. तेव्हां त्याला वाटलें आपण आळंदीला ज्ञानोबाच्या समाधीपाशीं अभ्यास करून पाहूं. म्हणून तो आळंदीला गेला. तेथें तो च प्रकार झाला. तेव्हां ब्राह्मण वैतागला आणि खाणेंपिणें सोडून ज्ञानोबांच्या समाधीपाशीं धरणें धरून बसला. त्या वेळीं तुकाराम महाराजांची कीर्ति आळंदीला सर्वांमुखीं झाली होती. जो तो म्हणे, 'तुक्याच्या वाणींत वेदार्थ प्रगट होतो.' हें धरणेकऱ्याच्या कानावर हि आलें च होतें. तो धरणें धरून बसला ज्ञानोबांच्या समाधीपाशीं, पण त्याचें चित्त तुकोबांच्याकडे धांव घेऊं लागलें होतें. अशांत त्याचा डोळा लागला आणि त्याला स्वप्नांत तुकाराम महाराजांकडे जाण्याविषयीं ज्ञानोबांचा परवाना मिळाला. तेव्हां तो जागा होऊन तडक देहूला हजर झाला. महाराजांना म्हणतो, "मला विद्या शिकवण्यासाठीं ज्ञानोबांनीं आपल्याकडे पाठविलें आहे." (स्वप्नांतला कां होईना, पण) ज्ञानोबांचा शब्द मोडणें महाराजांना अशक्य होतें. म्हणून त्यांनीं अत्यंत संकोचानें त्या धरणेकऱ्याला अकरा अभंगांत विद्येचा, म्हणजे विद्येचा नाद सोडून देण्याचा, उपदेश केला—

**नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं ।**
**शीघ्र व्रत करीं हें चि एक ॥ १ ॥**
**देवाचिये चाडे आळवावें देवा ।**
**ओस देहभावा पाडोनियां ॥ २ ॥**

पण तो त्या अभागी ब्राह्मणाला पटला नाहीं, आणि स्वारी तेथून निघून गेली. आपल्याला ह्यापुढें त्या ब्राह्मणाचा पाठलाग करण्याचें कांहीं च

कारण नाहीं. उपदेश करतांना स्वतःला नसतें महत्त्व येत आहे असें वाटून महाराजांच्या निरभिमानवृत्तीला धक्का बसला आणि देवाला उद्देशून त्यांच्या तोंडून खालील अभंग बाहेर पडला—

**नोहें दास खरा । परि हा झालासे डांगोरा ॥ १ ॥**
**काय करूं आतां । तूं हें सकळ जाणता ॥ २ ॥**
**नाहीं पुण्य गांठीं । जें हें वेंचूं कोणासाठीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे कां उपाधि । वाढविली कृपानिधि ॥ ४ ॥**

**ज्ञानियांचा गुरु राजा महाराव ।**
**म्हणती 'ज्ञानदेव' तुम्हां ऐसें ॥ १ ॥**
**मज पामरा हें काय थोरपण ।**
**पायींची वहाण पायीं बरी ॥ २ ॥**

ज्ञानोबांशीं आपली अप्रत्यक्षपणें तुलना झाली ही गोष्ट महाराजांना सहन झाली नाहीं. त्यांनीं 'पायींची वहाण' होणें च पसंत केलें आणि म्हणून ते भक्तांचे मुकुटमणि झाले.

(३) भोळेपणा हें भक्तांचें भूषण आहे. ह्याच्या च योगानें तुकोबांचा संसार नासला असें जगाला वाटतें. पण तुकोबांनीं परमार्थशास्त्राचा, म्हणजे खऱ्या अर्थशास्त्राचा, नीट अभ्यास केला होता. त्यामुळें त्यांनीं 'भोळिवेचें लेणें' पत्करलें. भक्ताच्या लक्षणांत भगवंतांनीं 'दक्ष' हें विशेषण घातलें आहे. तिकडे पुष्कळांनीं महाराजांचें लक्ष खेंचलें असावें. पण 'दक्ष' शब्दापुढें लागली च 'उदासीन' शब्द गीतेंत आहे. त्याच्या मदतीनें दक्ष शब्दाचा खरा अर्थ त्यांनीं लोकांना समजावून सांगितला आहे—

**आपुला तो देह आम्हां उपेक्षित ।**
**कोठें जाऊं हित सांगों कोणा ॥ १ ॥**
**कोण नाहीं दक्ष करितां संसार ।**
**आम्हीं हा विचार वमन केला ॥ २ ॥**

**'अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।' —गीता**

परमार्थांत 'दक्ष' आणि संसारांत 'उदासीन' असा अर्थ समजा-वयाचा आहे.

**जनासि वाटे हा दुश्चित । परि तो आहे सावचित ॥**
**जयाचें असे चित्त । परमेश्वरीं ॥ —समर्थ**

(४-५) दया, क्षमा, शांति : दुःखितांविषयीं दया, दुर्जनांविषयीं क्षमा, आणि सर्वत्र शांति, हे विष्णुदासांचे तीन 'अभंग बाण' आहेत आणि ईश्वरभक्ति 'कवच'.

(६) 'दक्ष' म्हटलें म्हणजे संसारांत दक्ष असा अर्थ होऊन बसावयाचा म्हणून तो अर्थ काढून टाकण्यासाठीं गीतेनें 'उदासीन' शब्द घातला. पण 'उदासीन' म्हणजे 'दुर्मुखलेला' असा अर्थ भासतो. तो हि नाहींसा व्हावा म्हणून 'गतव्यथः'—म्हणजे आनंदमय—हें विशेषण जोडणें भाग पडलें. भक्ताला दुःख माहीत च नाहीं.

(७) कारण—'वासुदेवः सर्वम्' अशी त्याची भावना आहे.

(८) आणि त्या च कारणामुळें त्याला जग मंगल दिसतें—

**जग अमंगळ । लागे देखतां विटाळ ॥ १ ॥**
**धर्म भूतांची ते दया । संत कारण ऐसिया ॥ २ ॥**
**नव्हे माझें मत । साक्षी करूनि सांगे संत ॥ ३ ॥**
**तुका म्हणे जीवें । दावीं उमटूनि अनुभवें ॥ ४ ॥**

जो जगाला अमंगळ मानतो त्याला विटाळ लागतो. भूतांची दया हा च खरा धर्म होय आणि त्याचा धडा घालून देणें हें संतांचें काम. हें केवळ माझें च मत आहे असें नाहीं. ह्याविषयीं संतांची साक्ष आहे. तुकाराम महाराज म्हणतात कीं मी माझ्या अनुभवानें ही वस्तु (पुन्हां एकदां) सिद्ध करून दाखवीत आहें इतकें च.

---

[९]

**घेईं घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥**
**डोळे तुम्ही घ्या रे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ २ ॥**
**तुम्ही आइका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥**
**मना तेथें धांव घेईं । राहें विठोबाचे पायीं ॥ ४ ॥**
**तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥**

ह्या अभंगांत आत्म्याच्या ताब्यांत असलेलीं इंद्रियें वगैरे सर्व साधनें ईश्वरार्पण केलीं आहेत.

(१) वाणी : सर्व कर्मेंद्रियें.

(२-३) डोळे आणि कान : सर्व ज्ञानेंद्रियें.

(४) मन : चित्तचतुष्टय (मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार)

(५) जीव : प्राण, किंवा उरलें सुरलेलें सर्व.

केनोपनिषदांत ह्या च पांचांचा विचार केलेला आहे—

**केनेषितं पतति प्रेषितं मनः**
**केन प्राणः प्रथमः प्रैति युक्तः**
**केनेषितां वाचमिमां वदन्ति**
**चक्षुः श्रोत्रं क उ देवो युनक्ति ॥ १ ॥**

**अर्थ—'मनाला धांवविणारा, प्राणाला जखडून टाकणारा, वाणीकडून वदविणारा, डोळे आणि कान ह्यांना राबविणारा कोण देव आहे ?'** जो कोणी आहे त्याच्यासाठीं हीं सगळीं राबवून घ्या असें ह्या अभंगाचें म्हणणें.

**जें मनाचें मन । जें नेत्राचें नयन ।**
**कानाचे कान । वाचेची वाचा ॥**
**जें प्राणाचा प्राण । —ज्ञानदेव**

राबवून घ्यावयाचें म्हटलें तरी ज्याच्या हातून जें होण्यासारखें आहे

तें च करवून घेतलें पाहिजे. वाणीचें काम बोलणें. तिच्याकडून विठोबाचें नाम बोलवून घ्या. डोळ्यांचें काम पाहणें. त्यांच्याकडून पाहून घ्या. काय पाहून घ्या? देव. देव दिसतोय कोठें?–मग देवाची मूर्ति पाहून घ्या. देवाची मूर्ति खरी. पण कोणची?—

**आत्मज्ञानें चोखडीं। संत जे माझीं रूपडीं।**
**तेथ दृष्टि पडो आवडी। कामिनी जैसी॥** —ज्ञानदेव

कानांचें काम ऐकणें. त्यांच्याकडून हरिकथा ऐकवून घ्या. पण मनाचें काम कोणचें? मनाचें काम 'धांवणें'. ही तर अनुभवाची गोष्ट आहे. 'चंचलं हि मनः कृष्ण' म्हणून अर्जुन हि तकरार करतो च आहे. म्हणून त्याला तुकाराम महाराजांनीं धांवण्याचें काम दिलें. 'मना तेथें धांव घेईं.' जा बाबा, ईश्वराकडे धांव घे, तुझी हि हौस फिटूं दे. पण त्यांना शंका आली कीं हें धांव तर घेईल, पण मुक्कामावर पोंचल्यावर तरी थांबेल कीं नाहीं कोणास ठाऊक! म्हणून त्याला मुक्कामावर मात्र 'सबूर' करण्याची सूचना देऊन ठेवली आहे—'राहें विठोबाचे पायीं.' बरें, जीवाचें काम कोणचें? जीव जातां जात नाहीं. चिकट आहे. धरली वस्तु पकडून ठेवण्याचा त्याचा स्वभाव आहे. मग त्याला तें च काम द्या. 'नको सोडूं या केशवा.'—देवाला घट्ट पकडून ठेव. सोडूं नको. जसा ह्या देहाला चिकटून बसला आहेस तसा देवाला चिकटून बैस.

खालील अभंगांत हि हीं च पांच आत्मसाधनें कृष्णार्पण केलीं आहेत—

**तुजविण वाणी आणिकाची थोरी।**
**तरी माझी हरि जिह्वा झडो॥ १॥**
**तुजविण चित्ता आवडे आणिक।**
**तरी हा मस्तक भंगो माझा॥ २॥**
**नेत्रीं आणिकासी पाहीन आवडी।**
**जातु तेचि घडी चांडाळ हे॥ ३॥**

**कथामृत-पान न करिती श्रवण ।**
**काय प्रयोजन मग ह्यांचें ॥ ४ ॥**
**तुका म्हणे काय वांचून कारण ।**
**तुज एक क्षण विसंबतां ॥ ५ ॥**

शेंवटच्या चरणांत 'काय वांचून कारण' हा 'जीवा'चा च पर्यायानें उल्लेख केला आहे हें उघड आहे.

ह्या अभंगांत चढता भाव आहे. पहिल्या चरणांत 'माझे वाचे' म्हणून वाणीला गोंजारून घेतलें आहे. असें गोंजारून घेतल्याशिवाय काम होणार हि नाहीं. म्हणून तें योग्य च आहे. पण त्यांत 'ममता' आहे. वाणी 'माझी' आहे. दुसऱ्या चरणांत ही ममता नाहींशी झाली आहे. 'माझे वाचे' ही भाषा जाऊन 'डोळे तुम्ही' अशी 'तूं'काराची भाषा सुरू झाली आहे. आतां इंद्रियें माझीं नाहींत हें झालें. आणि देवाविषयीं 'प्रीति' तर पहिल्यापासून च आहे. पण 'प्रीति' असली तरी अजून देवाविषयीं 'ममतेची' भाषा निघत नाहीं. 'डोळे तुम्ही' हें झालें पण 'विठोबा माझा' हें अजून व्हावयाचें आहे. तें तिसऱ्या चरणांत आहे. तेथें डोळ्यांप्रमाणें कानांना हि 'तुम्ही' म्हणून दूर सारलें आहे. आणि शिवाय विठोबा 'माझा' झाला आहे. इतकें झालें तरी ह्या सगळ्या भावनेच्या च गोष्टी. देव 'माझा' म्हटला तरी अजून दृष्टिपथांत आलेला नाहीं. प्रत्यक्ष दिसूं लागला नाहीं. तो चौथ्या चरणांत दिसूं लागला च. दिसूं लागल्याबरोबर मनाला तेथें धांव घेण्याचा हुकूम केला. पण देव दिसूं लागला तरी अजून तो 'तेथें' आहे. दूर आहे. मध्यंतरीं धांवण्याला अवकाश आहे. पण इतकें हें लिहीत आहें तेवढ्यांत हुकमी मनानें अंतर केव्हां च कापून टाकलें. चौथ्या चरणाच्या वेळीं विठोबा 'तेथें' होता, तो पांचव्या चरणांत 'हा इथें' आला. झालें. जीवाला प्रार्थना केली—नको सोडूं "या" केशवा. समाधि लागली !

---

[१०]

**मुनि मुक्त झाले भेणें गर्भवासा ।**
**आम्हां विष्णु-दासां सुलभ तो ॥ १ ॥**
**अवघा चि संसार केला ब्रह्मरूप ।**
**विठ्ठलस्वरूप म्हणोनियां ॥ २ ॥**
**पुराणीं उपदेश साधन उद्भट ।**
**आम्हां सोपी वाट वैकुंठींची ॥ ३ ॥**
**तुका म्हणे जनां सकळांसहित ।**
**घेऊं अखंडित प्रेमसुख ॥ ४ ॥**

गर्भवासाच्या भीतीनें मुनींनीं मुक्ति गांठली. पण तुकाराम महाराज म्हणतात, आम्हां विष्णुदासांना गर्भवासाचें कांहीं च कठिण वाटत नाहीं. आम्हीं सर्व संसार विठ्ठलस्वरूप समजून ब्रह्माच्या योग्यतेला आणला. पुराणांत मुक्तीचा कठिण मार्ग सांगितला आहे. पण आम्हीं वैकुंठाची सोपी वाट शोधून काढली आहे. ती कोणची ? वैकुंठास जाण्याच्या भरीस न पडतां येथें च राहून सगळ्या लोकांच्याबरोबर अखंड भक्तीचा आनंद भोगावा.

मुक्तीपेक्षां भक्ति श्रेष्ठ हा सिद्धान्त ह्या अभंगांत सांगितला आहे. मुक्तीची परवा न करणारीं शंभरावर वचनें तुकाराम महाराजांच्या गाथ्यांत आहेत. मुक्ति तुच्छ मानण्याचीं अनेक कारणें आहेत :

(१) मुक्तीचा अव्हेर करणाराला च मुक्ति झाली तरी मिळते. म्हणून ज्याला मुक्तीची इच्छा असेल त्यानें मुक्तीची इच्छा राखूं नये.

**रिघों पाहे माजीं बळें चि त्यांचें घर ।**
**दवडिती दूर म्हणोनियां ॥**

(२) मुक्ति मिळाली म्हणजे प्रगतीचा मार्ग च खुंटतो. भक्तीमध्यें चढती प्रगति आहे. भक्तीला अंत नाहीं. त्यामुळें नित्य नवीन उत्साह वाढत च राहतो.

**पुढती घडे चढतें सेवन आगळें ।**
**भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥**

(३) सगळ्यांना टाकून एकट्यानें मुक्त होण्यांत मौज नाहीं. एवढें च काय पण स्वार्थ आहे. प्रह्लादानें असें च म्हटलें आहे. मुक्तीचा त्याग करून भक्तीचा स्वीकार करणाऱ्या भागवत-धर्माचा मुख्य आचार्य प्रह्लाद.

**'प्रायेण देव-मुनयः स्व-विमुक्ति-कामा**
**मौनं चरन्ति विजने न परार्थ-निष्ठाः ।**
**नैतान् विहाय कृपणान् विमुमुक्ष एको**
**नान्यं त्वदन्य-शरणं भ्रमतोऽनुपश्ये ॥' —भागवत**

**'तुका म्हणे जनां सकळांसहित ।**
**घेऊं अखंडित प्रेम-सुख ॥' —तुकाराम**

(४) मुक्तींत अधिकार-भेदाचें लचांड आहे. भक्तीचा अधिकार सर्वांना आहे. मुक्ति-मार्ग विशिष्ट-पावन आहे. भक्ति-मार्ग विश्व-पावन, आणि त्यांतल्या त्यांत पतित-पावन, आहे.

**'सकळांसी येथें आहे अधिकार ।**
**कलियुगीं उद्धार हरिनामें ॥'**
**'चहूं वर्णांसी नामाधिकार ।' —समर्थ**

(५) मुक्ति-मार्ग कठिण. भक्ति-मार्ग सोपा.

**सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं ।**
**टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥**
**'भक्ति–पंथ बहु सोपा ।'**

**'अनन्य-चेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्य-युक्तस्य योगिनः ॥' —गीता**

(६) मुक्तिमार्गांत ज्ञानाचें प्रस्थ मोठें. आणि ज्ञान म्हटलें कीं अहंकार आला च. भक्ति नम्र आहे.

**'ज्ञानियाचे घरीं चोजविना देव ।**
**तेथें अहंभाव पाठी लागे ॥'**

**'बहु भितो जाणपणा**
**आड न यो नारायणा ।**
**घेईन प्रेम-पान्हा**
**भक्ति-सुख निवाडे ॥'**

(७) मुक्ति आणि भुक्ति हीं एका च काठीचीं दोन टोंकें आहेत. म्हणजे मुक्ति हा हि एक प्रकारचा संसार च झाला. मुक्ति म्हणजे भिन्न संसार असें च कां म्हणाना! भक्तीला संसाराची जशी आसक्ति नाहीं तशी भीति हि नाहीं.

**'मुनि मुक्त झाले भेणें गर्भवासा ।**
**आम्हां विष्णुदासां सुलभ तो ॥'**

**'तुका म्हणे गर्भ-वासीं ।**
**सुखें घालावें आम्हांसी ॥'**

(८) मुक्तींत बंधन आहे. अवतार घेण्याची सोय नाहीं. आणि भक्ताला तर देवाप्रमाणें (आणि देवाबरोबर) युगायुगीं अवतार घ्यावयाचे असतात. तेव्हां भक्ताचें मुक्तीशीं जमणार कसें?

**'मोक्षपद तुच्छ केलें या कारणें ।**
**आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥'**

**'मुक्ति-पांग (मुक्ति-'बंधन') नाहीं विष्णूचिया दासां ।'**

(९) शिवाय मुक्ति हें साध्य आहे असें मानलें तरी त्याचें भक्ति हें च सर्वोत्तम साधन आहे. आणि साधकाला साध्यापेक्षां साधन च अधिक महत्त्वाचें आहे. 'उपाये अधिको यत्नः कर्तव्यः ।' ह्या हि दृष्टीनें मुक्तीपेक्षां भक्ति श्रेष्ठ आहे. साधन करीत असतां फळ मिळेल कीं नाहीं ही विवंचना करतां कामा नये. 'मा फलेषु' ही गीतेची मुख्य शिकवण आहे. ईश्वरावर भरंवसा ठेवून मुक्तीचा हि मनानें त्याग केला पाहिजे.

**मोक्ष गांठीं असे ठेविला बांधोनि ।**
**सोस तो भजनीं आवडीचा ॥**
**भोजनाची चिंता माय वाहे बाळां ।**
**आम्हां तरी खेळावरी चित्त ॥**

मुलाचें लक्ष खेळण्यांत असावें. आई भोजनाची चिंता करण्यास समर्थ आहे.

(१०) भक्तिसुखापुढें मुक्तीचा आनंद तुच्छ आहे—नव्हे, दुःखरूप आहे.

**'कासयासी आम्हीं व्हावें जीवन्मुक्त ।**
**सांडूनियां थीत प्रेम-सुख ।'**
**'विटे ऐसें सुख नव्हे भक्ति-रस ।**
**पुढतापुढतीं आस सेवावें हें ॥'**
**'मोक्षाची निदैवा कोणा चाड ॥'**
**'मोक्षाएवढें सुख । सुख नव्हे तें चि दुःख ॥'**

(११) मुक्ति हें साध्य आहे. पण परम साध्य नव्हे. परम साध्य भक्ति.

**'मुक्तीवरील भक्ति जाण । अखंड मुखीं नारायण ॥'**
**'मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोडीस ॥'**

---

[११]

मनवाचातीत तुझें हें स्वरूप ।
म्हणोनियां मापं भक्ति केलें ॥ १ ॥
भक्तीचिया मापें मोजितों अनंता ।
इतरानें तत्त्वतां न मोजवे ॥ २ ॥
योग-याग-तपें देहाचिया योगें ।
ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही भोळ्या भावें सेवा ।
घ्यावी जी केशवा करितों ऐसी ॥ ४ ॥

हे अनंता, तुझें हें स्वरूप मन आणि वाणी ह्या दोहोंच्या पलीकडचें आहे. म्हणून तुला मोजण्यासाठीं भक्ति हें एक च माप केलेलें आहे. त्या मापानें आम्ही तुला मोजतों. इतर उपायांनीं तुझें वास्तविक माप काढणें अशक्य आहे. उदाहरणार्थ देहाच्या अनुषंगानें होणारीं योग, याग, तप इत्यादि साधनें, किंवा बौद्धिक ज्ञान, ह्यांच्या हातांत तूं कधीं च सांपडत नाहींस. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही भोळ्या भावानें कशी-बशी सेवा करतों, ती तुम्ही ग्रहण करा.

(१) मनानें वस्तूचें स्वरूप समजतें, आणि वाणीनें समजावून सांगतां येतें. पण ईश्वराचें स्वरूप मनानें समजत हि नाहीं, आणि वाणीनें समजावून सांगतां येत नाहीं.

यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह । —तैत्तिरीय

अर्थ—ठाय न पवतां जयाचा । मनेंसीं मुरडली वाचा ॥ —ज्ञानदेव

किंवा—न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें ।
बोलणें मागौतें । वोसरलें ॥ —ज्ञानदेव

तसेंच—

**अतीतः पन्थानं तव च महिमा वाङ्मनसयोः । —महिम्नस्तोत्र**

ह्यांत च डोळ्यांची भर घालून ईश्वराचें स्वरूप मन, वाचा आणि डोळा ह्या तिहींच्या पलीकडचें आहे असें हि म्हणण्याची रीत आहे. जसें—

**न तत्र चक्षुर्गच्छति, न वाग्गच्छति नो मनः । —केन**
**नैव वाचा न मनसा, प्राप्तुं शक्यो न चक्षुषा । —कठ**

अशा प्रकारें उल्लेख करण्यांत प्रत्यक्ष, अनुमान, आणि शब्द, हीं तिन्ही प्रमाणें ईश्वराच्या ठिकाणीं लटकीं पडतात असें दाखविण्याचा उद्देश असतो.

डोळा—प्रत्यक्ष
मन—अनुमान
वाचा—शब्द

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।**

**अर्थ—' सूर्य, चंद्र किंवा अग्नि, तिघांचा हि प्रकाश तेथें पोंचूं शकत नाहीं '**

ह्या गीतावचनाचा हि अर्थ असा च आहे. शास्त्रकारांनीं सूर्य ही डोळ्याची देवता, चंद्र मनाची देवता, आणि अग्नि वाणीची देवता मानलेली आहे.

**चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत ।**
**मुखादिन्द्रश्चाग्निश्च ।.........**

ही श्रुति प्रसिद्ध च आहे. म्हणून सूर्य, चंद्र आणि अग्नि, हे अनुक्रमें प्रत्यक्ष, अनुमान, आणि शब्द, ह्यांचे पर्याय आहेत. ह्या तिहींचा निषेध केल्याशिवाय वर्णन पूर्ण होऊं शकत नाहीं. म्हणून जेथें मन आणि वाणी ह्या दोहोंचा निषेध केला असेल तेथें चक्षूचा हि निषेध गृहीत आहे.

पण प्रस्तुत अभंगांत मात्र ' मनवाचातीत ' म्हणण्यांत हेतु आहे. येथें ' चक्षू ' चा निषेध नाहीं. कारण भक्ताच्या डोळ्यांपुढें ईश्वराची मूर्ति

प्रत्यक्ष दिसत आहे. "तुझें हें स्वरूप" असें म्हणून तो त्या मूर्तीकडे बोट दाखवीत आहे. अशा स्थितींत ईश्वराचें स्वरूप डोळ्याला गोचर नाहीं असें त्यानें कसें म्हणावें ?

(२) भक्तीच्या च मापानें ईश्वराला मोजणें शक्य आहे, असें गीतेंत स्पष्ट म्हटलें आहे :

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥**

तसें च—

**भक्त्या मामभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः ।**

**अर्थ—भक्तीनें मी केवढा आहें आणि कसा आहें ह्याचें तत्त्वतः ज्ञान होतें.**
ह्यांतील 'तत्त्वतः' शब्दाकडे लक्ष देतां

**भक्तीचिया मापें मोजितों अनंता ।**
**इतरानें "तत्त्वतां" न मोजवे ॥**

ह्या चरणावर गीतेच्या वचनाची छाप पडली आहे असें दिसतें. महाराजांची अभंगवाणी अनुभवाची आहे. पण त्यांनीं आपला अनुभव गीतेशीं पडताळून पाहिला आहे. महाराजांचें गीतेवर विशेष प्रेम होतें. त्यांनीं आपल्या जांवयाला गीतेच्या पुस्तकाची भेट दिली होती.

(३) भक्तीपुढें योग याग तपें तर काय पण ज्ञान देखील रद्द आहे.

**'नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं**
**न शोभते ज्ञानमलं निरंजनम् ॥' —भागवत**

**'जळो ते जाणीव जळो ते शहाणीव ।**
**राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥' —तुकाराम**

---

[१२]

**सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा ।**
**न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥**
**सत्यवादी करी संसार सकळ ।**
**अलिप्त कमळ जळीं जैसें ॥ २ ॥**
**घडे ज्या उपकार भूतांची ते दया ।**
**आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥ ३ ॥**
**न बोले गुण-दोष नाइके जो कानीं ।**
**वर्तोनि तो जनीं जनार्दन ॥ ४ ॥**
**तुका म्हणे वर्म जाणितल्याविण ।**
**पावे करितां शीण सांडी-मांडी ॥ ५ ॥**

ज्यानें सर्वस्वाचा त्याग केला तो नेहमींचा च सोंवळा आहे. जसा अग्नीला विटाळ माहीत च नाहीं तसा च त्याला हि विटाळ माहीत नाहीं. जो सर्व व्यवहार सत्याला अनुसरून करतो आणि त्यांत हि पुन्हां कमला-प्रमाणें अलिप्त राहतो त्यानें च सर्वस्वाचा त्याग केला. भूतदयेमुळें ज्याचें जीवन सेवामय बनलें आहे त्याच्या च अंगीं आत्मज्ञान बाणलें. जो गुण-दोषांच्या चर्चेपासून वेगळा राहिला तो जनांमध्यें वागत असला तरी ईश्वररूप च आहे. तुकाराम महाराज म्हणतात कीं खऱ्या त्यागाचें हें वर्म लक्षांत न घेतां जो 'हें सोड आणि तें जोड' असल्या नादीं लागला तो शीण मात्र पावणार आहे.

(१) त्याग म्हणजे टाकून देणें. पण सर्वस्वाचा त्याग म्हटला म्हणजे तेथें टाकून देण्याच्या 'क्रियेला' अवकाश राहत नाहीं. पाण्याचा धर्म वाहणें. पण जग पाण्यानें भरलें असें समजा. आतां तें पाणी कोठें आणि

कसें वाहणार? घराबाहेर जावयाचें तर 'जाण्याची क्रिया' होऊं शकेल. पण जगाबाहेर जावयाचें तर बसल्या जागीं कायम राहून मन अलग करणें ह्याशिवाय इलाज नाहीं. म्हणून 'सर्व-त्याग' ह्याचा अर्थ 'सर्वांत राहून (मनानें) त्याग' किंवा अहंकाराचा त्याग असा च समजला पाहिजे.

**तेवीं बुद्धिमंतीं देहीं । अहंता सांडूनि पाहीं ।**
**सांडिजे अशेष हि । संसार-जात ॥ —ज्ञानदेव**

(२) सत्याला धरून चालावें. आणि त्यांत हि अलिप्त रहावें. सत्यानें पाप मरतें. आणि अलिप्ततेनें पुण्य मरतें, म्हणजे चिकटत नाहीं. 'प्रवृत्ति' रजोगुणाचें लक्षण म्हटलें आहे. आणि 'अप्रवृत्ति' तमोगुणाचें लक्षण म्हटलें आहे. मग करावें कसें? एकीकडे रजोगुणाचा आड आणि दुसरीकडे तमोगुणाची विहीर. गीतेनें ह्यांतून मार्ग काढला आहे. अप्रवृत्तीचा त्याग कर. प्रवृत्तींत अलिप्त रहा. ह्याला निवृत्ति म्हणावयाचें. ह्याला दृष्टांत कमलाचा. 'कमल' ही वैदिक धर्माची खूण आहे. कमलांत पवित्रता व अलिप्तता दोन्ही गुण आहेत.

**'यथा पुष्कर-पलाशे आपो न श्लिष्यन्ते ।' —श्रुति**
**'लिप्यते न स पापेन पद्म-पत्रमिवाम्भसा ।' —गीता**

**मग मी व्यवहारीं असोनि वर्तत ।**
**जेवीं जळाआंत पद्म-पत्र ॥' —तुकाराम**

(३) **जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले**
**तो चि साधु ओळखावा । देव तेथें चि जाणावा**
**मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त**
**ज्यासी आपंगिता नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं**
**दया करणें जे पुत्रासी । ते चि दासा आणि दासी**
**तुका म्हणे सांगूं किती । तो चि भगवंताची मूर्ति ॥ —तुकाराम**

(४) **‘आणिकांचे कानीं । गुण-दोष मना नाणीं ॥’**

**‘कासया गुण-दोष वाणूं आणिकांचे ।**
**मज काय त्यांचें उणें असे ॥’** —तुकाराम

**‘गुण-दोष-दृशिर्दोषो गुणस्तूभय-वर्जितः ।’** —भागवत

**अर्थ—**

**पराचा देखावा दोष-गुण । हा चि दोषामाजीं महादोष जाण ।**
**गुणदोष न देखावा आपण । हा उत्तम गुण सर्वार्थीं ॥** —एकनाथ

(५) त्यागाचें वर्म न ओळखतां केलेला बाह्य त्याग ओझें होऊन बसतो.

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान् मनुष्येषु ॥** —गीता

अकर्मांत कर्म आणि कर्मांत अकर्म हें त्यागाचें वर्म जो ओळखतो तो च ‘बुद्धिमान्.’

खालील अभंग मननीय—

**जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥**
**मग मी व्यवहारीं असोनि वर्तत । जेवीं जळाआंत पद्म-पत्र ॥ २ ॥**
**ऐकोनि नाइकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनीं योगिराज ॥ ३ ॥**
**देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या जेवीं ॥ ४ ॥**
**तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तो शीण वाटतसे ॥ ५ ॥**

‘करणें तो शीण’ म्हणजे ‘वरवरचा त्याग करणें तो शीण’ असा अर्थ समजावा.

[१३]

**मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ॥ १ ॥**
**नको जाऊं देउळासी । नेतो बागुल लोकांसी ॥ २ ॥**
**वैष्णवां संगती । हातीं पडलीं नेणों किती ॥ ३ ॥**
**कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें लावी भीक ॥ ४ ॥**
**आम्हां कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ॥ ५ ॥**
**तुका म्हणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ६ ॥**

पोर सांगितलेलें ऐकत नाहीं. त्यामुळें आईबापांना चिंता पडली आहे—"अरे, देवळांत जात जाऊं नकोस. जो म्हणून देवळांत गेला, त्याला ह्या बागुलांनीं लांबविला. एकदां माणूस वैष्णवांच्या संगतीला लागला म्हणजे हळूं हळूं तो त्यांच्या कचाट्यांत सांपडतो. असें आजपर्यंत ह्यांनीं कितीक पकडले कोणास ठाऊक? हे पुराणिक कानांत भलभलतें भरून भुरळ पाडतात, आणि शेवटीं भिकेला लावतात. तूं जर असा ह्या नागड्याच्या नादीं लागलास तर मग आमच्या काय उपयोगाला येशील?"

तुकाराम महाराज म्हणतात, जर तुम्हांला नरकांत जाणें असेल तर ह्यांचा हा उपदेश ऐकत चला.

आपण 'बिघडून' दुसऱ्यांना 'बिघडविणें' हा संतांचा स्वभाव च आहे. त्यांतून 'तरुणांना' बिघडविणें हें तर त्यांचें अवतारकार्य. त्यामुळें आईबापांना चिंता वाटणें साहजिक आहे. तुकाराम महाराजांच्या उपदेशानें त्या काळच्या तरुण पिढीवर वैराग्याची छाप पडूं लागली होती. त्यांतून आपल्या सोनुल्यांना बचावण्यासाठीं आईबाप कशी काळजी घेत त्याचें वर्णन ह्या अभंगांत आहे.

आईबापांचे वैष्णवांवर मुख्य दोन आक्षेप होते :

(१) ह्यांच्या नादीं लागून मुलांचा संसार धुळीस मिळतो. तीं भिकेला लागतात.

हा आक्षेप तुकाराम महाराजांना अक्षरशः कबूल आहे. संसाराचें वाटोळें होणें ही त्यांनीं ईश्वरी कृपेची खूण च मानली आहे—

**देवाची ते खूण आला ज्याच्या घरा ।**
**त्याच्या पडे चिरा संसारासी ॥ १ ॥**
**देवाची ते खूण करावें वाटोळें ।**
**आपणावेगळें राहों नेदी ॥ २ ॥**

प्रपंच किंवा परमार्थ कांहीं तरी एक साधेल. दोन्ही गोष्टी साधणार नाहींत ही गोष्ट तुकाराम महाराजांनीं निक्षून सांगितली आहे—

**प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही ।**
**एक हि निदानीं नव्हे त्यासी ॥ १ ॥**
**दोन्ही पेंवांवरी ठेवूं जातां हात ।**
**होय अपघात शरीराचा ॥ २ ॥**
**तुका म्हणे तया दोहींकडे धक्का ।**
**शेवटीं तो नरकामाजीं पडे ॥ ३ ॥**

अशा स्थितींत आईबापांना बोल कां लावावा ?

(२) वैष्णवांवरचा दुसरा आक्षेप म्हणजे ह्यांच्या नादीं मुलें लागलीं म्हणजे तीं ‘ आईबापांचीं मुलें ’ राहत नाहींत.

हा हि आक्षेप तुकोबांना नाकबूल नाहीं. कारण ममतेचा पाश तुटणें हें च त्यांच्या मतें भक्तीचें लक्षण आहे—

**भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास ।**
**गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥**
**विषय तो त्यांचा झाला नारायण ।**
**नावडे जन धन माता पिता ॥ २ ॥**

तसेंच—

**देवाची ते खूण गुंतों नेदी आशा ।**
**ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥**

ईश्वरप्राप्तींत अंतरायभूत होत असतील त्यांचा त्याग करावा असें कबीर आणि तुलसीदासजी म्हणतात. त्याला तुकाराम महाराजांची हि संमति आहे :

**'प्रह्लादने पिता तज्यो भरतने अपनी माय ।**
**बिभीसनने भाई तज्यो श्रीरामके काज ॥'** —कबीर

**'जाके प्रिय न राम वैदेही ।**
**त्यजिये ताहि कोटि बैरीसम**
**जद्यपि परम सनेही ॥**
**त्यज्यो पिता प्रहलाद, बिभीखन**
**बंधु, भरत महतारी ॥'** —तुलसीदास

**'जेणें नारायणीं घडे अंतराय ।**
**हो कां बापमाय त्यजावीं तीं ॥**
**प्रह्लादें जनक बिभीषणें बंधु ।**
**राज्य माता निंद्य भरतें केली ॥'** —तुकाराम

आईबापांनीं असे आक्षेप काढले म्हणून तुकाराम महाराज त्यांना दोष देत नाहींत. त्यांना बिचाऱ्यांना खरें हित समजत नाहीं म्हणून ते मुलांना धोपट मार्ग दाखवितात :

**हित नाहीं ठावें जननी-जनका ।**
**दाविला लौकिकाचार तिहीं ॥**

ते प्रेमानें च सांगतात. पण ऐकणारानें तें ऐकूं नये एवढें च त्यांचें म्हणणें.

आईबापांचें भलतें म्हणणें ऐकूं नये. पण त्यांची सेवा ही केली च पाहिजे, असा महाराजांचा कटाक्ष आहे :

**मायबापें केवळ काशी । तेणें नव जावें तीर्थासी ॥**
**पुंडलीकें काय केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥**

महाराजांच्या संगतीनें 'बिघडलेल्या' एका मुलाविषयीं त्याचे आईबाप म्हणतात—

**काय करूं पोरा लागली चट । धरी वाट देवळाची ॥ १ ॥**
**सांगितलें नेघे कानीं । दुजें, मनीं विठ्ठल ॥ २ ॥**
**काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥ ३ ॥**
**आमचे कुळीं नव्हतें ऐसें । हें चि पिसें निवडलें ॥ ४ ॥**
**लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ५ ॥**
**तुका म्हणे नरका जाणें । या वचनें दुष्टांच्या ॥ ६ ॥**

[१४]

झाला प्रेतरूप शरीराचा भाव ।
लक्षियेला ठाव श्मशानींचा ॥ १ ॥
रडती रात्रंदिवस काम-क्रोध-माया ।
म्हणती हाय हाय यमधर्म ॥ २ ॥
वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा ।
ज्ञानाग्नि लागला ब्रह्मत्वेंसीं ॥ ३ ॥
फिरविला घट फोडिला चरणीं ।
महावाक्य-ध्वनि बोंब झाली ॥ ४ ॥
दिली तिलांजली कुळ-नाम-रूपासी ।
शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ५ ॥
तुका म्हणे रक्षा झाली आपोआप ।
उजळला दीप गुरुकृपा ॥ ६ ॥

मरणाच्या आधीं च शरीरभावना नाहींशी झाल्यामुळें शरीराचें शव होऊन गेलें आहे. आतां बसल्या जागीं श्मशान-वास झाला. काम-क्रोध-लोभादि जिवलग रात्रंदिवस रडूं लागले. इकडे यमधर्म हि 'हाय हाय' म्हणून हात चोळीत बसला. शरीराभोंवतीं वैराग्याच्या गोंवऱ्या रचून ज्ञानरूप अग्नि शिलगवून दिला. त्यामुळें शरीर ब्रह्मसात् झालें. शरीराचा घडा देवाजीच्या समोर फिरवून त्याच्या चरणीं फोडून टाकला. 'मी ब्रह्मरूप आहें' ह्या महामंत्राची आरोळी ठोकली. जाति, कुल, नाम, रूप ह्यांना तिलांजली देऊन शरीर ज्याचें होतें त्याच्या हवालीं केलें. तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारें 'माझी' आपोआप रक्षा झाली. गुरुकृपेचा दिवा उजळला म्हणून हें सर्व झालें.

ह्या अद्भुत अभंगांत तुकाराम महाराजांनीं आपला सोळावा संस्कार वर्णिला आहे.

(१) शरीराचें शव करणें—

ह्याचे दोन अर्थ आहेत :

(अ) शरीराविषयींची 'ममता' उडविणें. आणि (आ) काया अमंगळ वाटणें.

**'विवेकें देहेबुद्धि सोडून द्यावी ।
विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ॥'** —समर्थ

**'शौचात् स्वाङ्ग-जुगुप्सा ।'** —योगसूत्र

**अर्थ—शुचि-भावनेचा शेवट स्वतःच्या शरीराविषयीं किळस वाटण्यांत होतो.**

(२) काम-क्रोध-लोभांना रडविणें—

मरणाच्या आधीं ह्यांना जिंकून घेण्यांत खरी कसोटी आहे.

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीर-विमोक्षणात् ।
काम-क्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥** —गीता

(३) ज्ञान-वैराग्यानें ब्रह्मसात् होणें—

ज्ञानावांचून मुक्ति नाहीं. आणि वैराग्यावांचून ज्ञान नाहीं.

**'ज्ञान जयाचां हातीं । तो चि समर्थ मुक्ती ।'** —ज्ञानदेव

**'तरी विरक्तीवांचून कहीं । ज्ञानासि तगणें नाहीं ।'**
—ज्ञानदेव

(४) देवाच्या चरणीं घडा फोडणें—

लोकसेवेंत ‘ अहं ’ विसरणें.

**अणुरणीयां थोकडा । तुका आकाशाएवढा ॥ १ ॥**
**गिळुनी सांडिलें कळिवर । भव-भ्रमाचा आकार ॥ २ ॥**
**सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे आतां । उरलों ‘ उपकारापुरता ’ ॥ ४ ॥**

(५) शरीर त्याच्या मालकाला अर्पण करणें—

**माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांत चि गेलें ॥**
**तया पाणियाऐसें केलें । होआवें गा ॥ —ज्ञानदेव**

(६) इतकें झालें म्हणजे आपोआप रक्षा होते. रक्षा म्हणजे ‘ राख. ’ आणि रक्षा म्हणजे ‘ रक्षण. ’ शरीराची राख आणि आत्म्याचें रक्षण.

[१५]

**तूं माउलीहूनि मायाळ । चंद्राहूनि शीतळ ।**
**पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥ १ ॥**
**देऊं काशाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा ।**
**ओंवाळूनि नामा । तुझ्या वरूनि टाकिलों ॥ २ ॥**
**तुवां केलें रे अमृता । गोड, त्या हि तूं परता ।**
**पांचा तत्त्वांचा जनिता । सकळ-सत्ता-नायक ॥ ३ ॥**
**कांहींच न बोलोनि आतां । उगाच चरणीं ठेवितों माथा ।**
**तुका म्हणे पंढरिनाथा । क्षमा करीं अपराध ॥ ५ ॥**

(१) तूं माउलीहूनि मायाळ — 'आई' ह्या एका शब्दांत काय येतें आणि काय येत नाहीं हें कोण मायेचा पूत सांगूं शकेल ?

**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ।**

असें 'का मे जननी को मे तातः' म्हणणाऱ्या आचार्यांचे च उद्गार आहेत. पण कलियुगांत जशी श्रुति मलिन झाली तशी आई हि. एखादे वेळीं मुलावर विटली तर आश्चर्य मानतां येत नाहीं. पण—

**कदाचित विटेल वा तव दया न दीनावरी । —केका**

(२) चंद्राहूनि शीतळ । पाणियाहूनि पातळ—

**जाणों जगीं आप बोलें । तें तुझिया बोला सुरस झालें ।**
**तुझेनि क्षमत्व आलें । पृथ्वीयेसी ॥**
**रविचंद्रादि शुक्ती । उदय करिती त्रिजगती ।**
**तें तुझिया दीप्ती । तेज तेजीं ॥ —ज्ञानदेव**

(३) कल्लोळ प्रेमाचा—

**‘राया जो निर्मळु। निष्कलंक लोक-कृपाळु।**
**शरणागतां स्नेहाळु। शरण्य जो॥**
**पैं सुर-सहाय-शीळ। लोक-लालन-लीळ।**
**प्रणत-प्रतिपाळ। खेळ जयाचा॥’**
**‘जो भक्तजन-वत्सल। प्रेमळजन-प्रांजळ।’** —ज्ञानदेव

(४) देऊं काशाची उपमा। दुजी तुज पुरुषोत्तमा—

जर ईश्वराला दुसऱ्या एखाद्या वस्तूची उपमा देतां आली तर ती च वस्तु ईश्वर कां होणार नाहीं? कारागिराला चित्राची उपमा कशी देतां येईल?

**‘एकमेवाद्वितीयम्।’** —श्रुति
**‘यो विश्वस्य प्रति-मानं बभूव।’** —ऋग्वेद

**अर्थ—जो विश्वाचें माप बनला (त्याचें माप कसें काढणार?)**

(५) ओंवाळुनि नामा। तुझ्या वरूनि टाकिलों—

**‘स्वानंदाचे ताटीं धूप दीप पंचारती वो।**
**ओंवाळिली माता विठाबाई पंच-भूतीं वो।’** —तुकाराम
**‘तेथ अहं धूप जाळूं। नाहं तेजें ओंवाळूं।**
**सामरस्यें पोटाळूं। निरंतर॥’** —ज्ञानदेव

पंचप्राणांची पंचारती केल्याशिवाय पूजा समाप्त होत नाहीं.

(६) तुवां केलें रे अमृता। गोड, त्या हि तूं परता—

**‘जीवाचें जीवन अमृताची तनु।**
**ब्रह्मांड-भूषणु नारायण॥**
**गोडाचें हि गोड हर्षाचें हि कोड।**
**प्रीतीचा हि लाड नारायण॥** —तुकाराम

‘परमामृताचें’ वर्णन ज्ञानेश्वर महाराजांच्या शब्दांत —

**जें मंदराचळ न ढाळितां । क्षीरसागर न डहुळितां ।**
**अनादि स्वभावतां । आइतें आहे ॥**
**जें स्रवे ना द्रवे नव्हे बद्ध । जेथ नेणिजती रस गंध ।**
**जें भलतेया हि सिद्ध । आठवलें चि फावे ॥**
**जयाची गोठी चि ऐकत खेंवो । आघवा संसार होय वावो**
**वळिया नित्यता लागे येवों । आपणपेंया ॥**
**जन्म-मृत्यूची भाख । हारपोनि जाय निःशेख ।**
**आंतबाहेरीं महासुख । वाढों चि लागे ॥**

(७) पांचा तत्त्वांचा जनिता । सकळ-सत्ता-नायक —

**‘भयादस्याग्निस्तपति । भयात् तपति सूर्यः ।**
**भयादिन्द्रश्चाग्निश्च । मृत्युर्धावति पञ्चमः ॥’ —श्रुति**

**‘आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नावभरी उगें नसावें ।**
**पावकें दाहावें । वर्षावें जळें ॥**
**पर्वतीं बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी ।**
**पृथ्वीया भूतें वाहावीं । हे आज्ञा माझी ॥**
**म्यां बोलविल्या वेद बोले । म्यां चालविल्या सूर्य चाले ।**
**म्यां हालविल्या प्राण हाले । जो जगातें चाळिता ॥’—ज्ञानदेव**

(८) कांहींच न बोलोनि आतां । उगाचि चरणीं ठेवितों माथा —

**यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता ।**
**चरणीं ठेविजे माथा । हें चि भलें ॥ —ज्ञानदेव**

(९) तुका म्हणे पंढरीनाथा । क्षमा करीं अपराध—

**'आतां ऐसिया अपराधां । मर्यादा नाहीं गोविंदा ।**
**म्हणोनि रक्ष रक्ष प्रमादा- । पासोनियां ॥'**

**'पुत्राचे अपराध । जरी झाले अगाध ।**
**तरी पिता साहे निर्द्वंद्व । तैसे साहिजो जी ॥'**

**'आणि देवाचेनि क्षमत्वें क्षमा ।**
**आधार जाली आहे या भूतग्रामा ।**
**म्हणौनि जी पुरुषोत्तमा ।**
**विनवूं तें थोडें ॥**

**तरी आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया ।**
**क्षमा कीजो जी यया । अपराधांसी ॥' —ज्ञानदेव**

[१६]

**बीज भाजुनि केली लाही ।**
**आम्हां जन्म मरण नाहीं ॥ १ ॥**
**आकारासी कैंचा ठाव ।**
**देह प्रत्यक्ष झाला देव ॥ २ ॥**
**साखरेचा नव्हे ऊंस ।**
**आम्हां कैंचा गर्भवास ॥ ३ ॥**
**तुका म्हणे अवघा जोग ।**
**सर्वां घटीं पांडुरंग ॥ ४ ॥**

जोंधळा भाजून एकदां त्याची लाही बनवली म्हणजे मग पुन्हां त्या लाहीचा जोंधळा बनूं शकत नाहीं. त्याप्रमाणें तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही मृत्यूंतून अमृतांत दाखल झाल्यामुळें आतां पुन्हां मृत्यूच्या ताब्यांत जाणार नाहीं. आतां आम्ही जरी साकार दिसत असलों तरी वास्तविक आकाराशीं आमचा संबंध उरला नाहीं. कारण, देह च मुळीं प्रत्यक्ष देवरूप बनला आहे. उंसाची साखर केल्यानंतर आतां किती हि प्रयत्न केला तरी तिचा पुन्हा ऊंस होणें शक्य नाहीं. त्याप्रमाणें आम्ही गर्भ-वासांतून अमरत्वाच्या प्रांतांत दाखल झाल्यामुळें पुन्हां मागें गर्भवासांत जाणार नाहीं. ह्यापुढें आमचे सर्व भोग 'जोग' च आहेत. कारण, आतां भूत-मात्रीं हरीशिवाय दुसरें कांहीं दिसत च नाहीं.

ह्या अभंगांत तुकाराम महाराजांनीं ब्राह्मी स्थितीचा अनुभव वर्णिला आहे.

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । —गीता**

**अर्थ—ही ब्राह्मी स्थिति एकदां प्राप्त झाल्यावर पुनः मनुष्याला मोह प्राप्त होत नाहीं.**

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव । —गीता**

**अर्थ—हें पवित्र ज्ञान तुला लाभेल तेव्हां पुनः मोहाची भेट होणार नाहीं.**

ब्राह्मी स्थितीला वेदोपनिपदांत 'तद् विष्णोः परमं पदम्' – विष्णूचें परम पद – असें नांव दिलें आहे. ह्याला च गीतेंत भगवंतांनीं 'माझें परम धाम' म्हटलें आहे. आणि तें प्राप्त झाल्यावर पुन्हां पूर्वपदावर येणें नाहीं असें दोनदां म्हटलें आहे.

**यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम ।**
**—गीता, अ. ८ आणि अ. १५**

ह्या गीतावचनावर ज्ञानेश्वर महाराजांनीं जें भाष्य केलें आहे त्याच्या आधारानें हा अभंग रचलेला आहे—

**'तरी अग्निमाजीं आलें । जैसें इंधन चि अग्नि जालें ।**
**पाठीं न निवडे चि कांहीं केलें । काष्ठपणें ॥**
**'ना तरी साखरेचा माघौता । बुद्धिमंतपणें हि करितां ।**
**ऊंस नव्हे पांडुसुता । जियापरी ॥'**
**'लोहाचें कनक जालें । हें एक परिसें चि केलें ।**
**आतां आणिक कैंचें तें गेलें । लोहत्व आणी ॥**
**म्हणौनि तूप होऊनि माघौतें । जेंवि दूधपणा न ये चि निरुतें ।**
**तेंवि पावोनियां जयातें । पुनरावृत्ति नाहीं ॥'**
**'पुढती जे तेथ गेले । ते न घेती माघौतीं पाउलें ।**
**महोदधी कां मीनलें । स्रोत जैसे ॥**

**कां लवणाची कुंजरी । सूदलिया लवण-सागरीं ।**
**होय चि ना माघारी । परती जैसी ॥'**
**'ना ना गेलिया अंतराळा । न येती चि वह्निज्वाळा ।**
**नाहीं तप्त लोहौनि जळा । निघणें जेंवि ॥**
**तेंवि मजसी एकवट । जे जाले ज्ञानें चोखट ।**
**तेयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥' —ज्ञानदेव**

ह्या ओव्यांत ज्ञानेश्वर महाराजांनीं (१) अग्नि-काष्ट, (२) उंसाची साखर, (३) लोह-कनक, (४) दुधाचें तूप, (५) मोहदधि-स्रोत, (६) लवण-कुंजरी, (७) वह्नि-ज्वाळा, (८) तप्त लोहावरचें पाणी असे आठ दाखले दिले आहेत. पैकीं ह्या अभंगांत तुकाराम महाराजांनीं साखरेचा दाखला उतरून घेतला आहे आणि 'बीज भाजुनि केली लाही' हा नवीन दाखला जोडला आहे.

---

[१७]

**कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद । आनंदें आनंद वाढवावा ॥ १ ॥**
**बहुतांच्या भाग्यें लागलें जहाज । येथें आतां काज लवलाही ॥ २ ॥**
**अलभ्य तें आलें दारावरी फुका । येथें आतां चुका न पाहिजे ॥३॥**
**तुका म्हणे जिव्हा-श्रवणाच्या द्वारें । माप भरा बरें शिगेवरी ॥४॥**

तुकाराम महाराज म्हणतात, " हीं जीं मी वचनें बोलत आहें तीं माझ्या पदरचीं नाहींत. तीं संतांच्या कृपेनें प्राप्त झालेलीं आहेत. तो देवाचा प्रसाद आहे. त्या वचनांचें जो श्रवण पठण करील तो मौजेनें ब्रह्मानंद गांठणार आहे. बहुजनसमाजाची थोर पुण्याई म्हणून हें देवाच्या घरच्या मालानें भरलेलें जहाज आज बंदराल लागलें आहे. म्हणून शक्य तितक्या लवकर आतां आपलें काम करून घ्या. अलभ्य वस्तु दारीं चालून आली आणि फुकट मिळते आहे. अशा स्थितींत कोणी गैरसावधपणानें किंवा आळसानें चूक करूं नका. हीं वचनें स्वतः श्रवण करा, लोकांना ऐकवा. शिगेला लागेपर्यंत माप भरभरून माल घ्या. संकोच राखूं नका. "

" बहुजनसमाजाच्या कल्याणासाठीं देवानें माझ्याकडून वचनें बोलविलीं आहेत, म्हणून सर्वांनीं तीं खुशाल लुटावीं, " असें ह्या अभंगांत महाराजांनीं जाहीर केलें आहे.

(१) कृपेचीं उत्तरें—

**कृपेचे सागर हे चि साधुजन । तिहीं कृपादान केलें मज ॥**
**आधारें वदलों प्रसादाची वाणी । उच्छिष्ट-सेवनीं तुमचिया ॥**
**संताचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां पामरें जाणावें हें ॥**

**—तुकाराम**

**किंबहुना तुमचें केलें। धर्म-कीर्तन हें सिद्धी गेलें।**
**एथ माझें जी उरलें। पाइकपण॥ —ज्ञानदेव**

(२) देवाचा प्रसाद—

**देवाच्या प्रसादें करा रे भोजन।**
**व्हाल कोण कोण अधिकारी ते॥**
**फोडिलें भांडार धन्याचा हा माल।**
**मी तंव हमाल भारवाही॥**

"आपुलिया बळें नाहीं मी बोलत" हा अभंग प्रसिद्ध च आहे 'माझ्याकडून देव बोलवून घेत आहे' ही जाणीव महाराजांच्या अनेक अभंगांत त्यांनीं प्रगट केली आहे. उदाहरणार्थ खालीं एक च अभंग देतों:

**करितों कवित्व म्हणाल हें कोणी।**
**नव्हे माझी वाणी पदरींची॥ १॥**
**माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार।**
**मज विश्वंभर बोलवितो॥ २॥**
**काय मी पामर जाणें अर्थ-भेद।**
**वदवी गोविंद तें चि वदें॥ ३॥**
**निमित्त मापासी बैसविलों आहें।**
**मी तों कांहीं नव्हें स्वामि-सत्ता॥ ४॥**
**तुका म्हणे आहे पाईक चि खरा।**
**वागवितों मुद्रा नामाची हे॥ ५॥**

(३) श्रवणानें मोक्षाची सुलभता—

**जरी मंत्रें चि वैरी मरे। तरी वायां कां बांधावे कटारे।**
**रोग जाय दुधें साखरें। तरी निंब कां पियावा॥**
**तैसा मनाचा मार न करितां। इंद्रियां दुःख न देतां।**
**एथ मोक्ष असे आइता। श्रवणा चि माजीं॥ —ज्ञानदेव**

(४) बहुजनसमाजासाठीं तुकाराम महाराजांचा जीव कळवळे. त्यांच्यासाठीं हीं वचनें देव माझ्याकडून बोलवीत आहे असें त्यांस वाटे. सर्वांना घेऊन पुढें जावें अशी त्यांची वृत्ति होती. म्हणून च

**अर्भकाचेसाठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥**
**तैसे संत जगीं । क्रिया करुनि दाविती अंगीं ॥ २ ॥**
**बाळकाचे चाली । माता जाणून पाउल घाली ॥ ३ ॥**
**तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥ ४ ॥**

ह्या त्यांच्या च अभंगाप्रमाणें त्यांनीं अर्भकासाठीं—बहुजनसमाजासाठीं—हातांत 'पाटी' धरली होती.

**या रे या रे लहान थोर । याती भलते नारी नर ॥**

अशी ते सर्वांना हांक मारीत.

**एकमेकां करूं साह्य । अवघे धरूं सुपंथ ॥**

हा त्यांचा बाणा होता. 'देवाचा प्रसाद' सर्वांना मिळाला च पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. आणि खरोखर च देवाचा प्रसाद त्यांनीं सर्वांकडून लुटविला ह्यांत शंका नाहीं :

**अवघियापुरतें वोसंडलें पात्र ।**
**अधिकार सर्वत्र आहे तेथें ॥**

(५) अलभ्य वस्तु, दारावर आली, आणि फुकट मिळते असा तिहेरी लाभ आहे. म्हणून भरपूर लुटा. 'अलभ्य वस्तु' म्हणजे पारमार्थिक ज्ञान अथवा ब्रह्मविद्या. 'दारावर' आली म्हणजे मराठी भाषेंत प्रगट झाली. आणि फुकट मिळते म्हणजे मराठी भाषा तर खरी च पण ती हि कुणब्याची मराठी, समजण्याला मुळीं च परिश्रम पडत नाहींत.

[१८]

निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें ।
साधन बरवें हें चि एक ॥ १ ॥
तरी च अंगीकार करील नारायण ।
बडबड तो शीण येणेंविण ॥ २ ॥
सोइरें पिशुन समान चि घडे ।
चित्त पर ओढे उपकारीं ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ ।
तरी च सकळ केलें होय ॥ ४ ॥

सर्व भूतांच्या ठिकाणीं निर्वैरभावना राखणें हें च एक योग्य साधन आहे. हें होईल तर च नारायण अंगीकार करील. याशिवाय बाकीची बडबड म्हणजे नुसता शीण होय. चित्त लोकांच्या सेवेकडे ओढ घेत आहे आणि शत्रु-मित्र सारखे झाले आहेत इतकी निर्वैरभावना जागली पाहिजे. तुकाराम महाराज म्हणतात, चित्त निर्मळ झालें तर च सर्व कांहीं केल्याचें सार्थक आहे.

(१) निर्वैरभावना हें च ईश्वरप्राप्तीचें साधन भगवद्गीतेंत सांगितलें असून हा गीतेचा उपदेश म्हणजे 'सर्वार्थ-सार' आहे असें शंकराचार्यांनीं म्हटलें आहे :

**निर्वैरः सर्व-भूतेषु यः स मामेति पांडवा ।**

(२) शत्रु-मित्र सारखे वाटूं लागणें हा निर्वैरभावनेचा परिणाम आहे.

**सुहृन्मित्रार्युदासीन-मध्यस्थ-द्वेष्य-बन्धुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥**

(३) परोपकाराविषयीं तत्परता हें निर्वैरभावनेचें विधायक

स्वरूप आहे. परोपकारावर तुकाराम महाराजांचा विशेष भर आहे. आणि हा परोपकार शरीर-कष्टानें झाला पाहिजे, असें हि त्यांनीं म्हटलें आहे. आत्मचरित्रांतील खालील. चरण पहा—

**ठाकला तो कांहीं केला उपकार ।**
**केलें हें शरीर कष्टवूनि ॥**

परोपकार हें च पुण्य आणि परपीडा हें च पाप अशा व्याख्या त्यांनीं दिल्या आहेत—

**पुण्य तें परउपकार पाप तें परपीडा ।**
**आणिक नाहीं जोडा दुजा यांसी ॥**

सर्व पुराणांचें सार हें च आहे—

**अष्टदश-पुराणानां सारं सारं समुद्धृतम् ।**
**परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥**

तसें च खालील वचनें :—

**‘ परउपकारें काया वाचा मन ।**
**वेंची सुदर्शन रक्षी तया ॥ ’**
**‘ परउपकारी नमो पुण्यवंता । ’**
**‘ तुका म्हणे फार । थोडा तरी परउपकार ॥ ’**
**‘ परउपकार । एका वचनाचा फार ॥ ’** इत्यादि

(४) शेवटीं सर्व कर्मांची सफलता चित्त-शुद्धींत :

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्म-शुद्धये ॥** —गीता

योगी शरीरानें, इंद्रियांनीं, मनानें, बुद्धीनें जीं जीं कर्में करतात तीं सारीं संग सोडून आत्मशुद्धीसाठीं करतात.

निर्वैरभावना ही च चित्त-शुद्धीची कसोटी समजली पाहिजे.

---

[१९]

आम्ही सदैव सुडके । जवळी येतां चोर धाके ।
जाऊं पुढें भिके । कुतरीं घर राखिती ॥ १ ॥
नांदणूक ऐसी सांगा । नाहीं तरी वायां भागा ।
थोरपण अंगा । तरी ऐसें आणावें ॥ २ ॥
अक्षय साचार । केलें सायासांनीं घर ।
एरंड सिंहार । दुजा भार न साहती ॥ ३ ॥
धन कण घरोघरीं । पोट भरे भिकेवरी ।
जतन तीं करी । कोण गुरें वासरें ॥ ४ ॥
झाली सकल निश्चिंती । भांडवल शेण-माती ।
झळझळीत भिंती । वृंदावनें तुळशीचीं ॥ ५ ॥
तुका म्हणे देवा । अवघा निरविला हेवा ।
कुटुंबाची सेवा । तो चि करी आमुच्या ॥ ६ ॥

आम्ही नेहमींचेच नंगे. त्यामुळें चोरसुद्धां जवळ यावयाला भितो. बाहेर भीक मागावयाला गेलों म्हणजे इकडे कुतरीं आमचें घर सांभाळतात. अशी कोणाची वागणूक असेल तर सांगा. बाकीच्या क्षुद्र वैभवाच्या गोष्टी म्हणजे फुकट शीण आहे. तो नका मला सांगूं. महत्त्वाकांक्षाच राखावयाची तर आमच्यासारखे होण्याची राखा. आम्हीं मेहनत करून खरोखरच अक्षय घर संपादन केलें आहे. वरून वरूनच पहाल तर एरंडाच्या आणि शेराच्या लांकडांचें बनलेलें. दुसऱ्या कशाचाच भार म्हणून सहन व्हावयाचा नाहीं. आमची संपत्ति घरोघर सांठवून ठेवली आहे. त्यांतून भूक लागेल तेव्हां मागून घेतों. गुरें-ढोरें कोण राखत बसतो ? आम्हांला सर्व प्रकारची निश्चिंती आहे. शेण-माती हें

आमचें भांडवल. त्यांच्या योगानें तुळशी-वृंदावन आणि कुडाच्या भिंती झळझळीत सारवून ठेवतों. तुकाराम महाराज म्हणतात, आम्हीं आमच्या सर्व वासना देवावर सोंपविल्या आहेत. तोच आमच्या कुटुंबाची काळजी करीत असतो.

ह्या अभंगांत अपरिग्रह-वृत्तीची मौज वर्णिली आहे.

पहिल्या पांच चरणांत स्थूल अपरिग्रह वर्णिला आहे. पण त्याचा अक्षरशः अर्थ घ्यावयाचा नाहीं. त्यांतून सूक्ष्म भाव ग्रहण करावयाचा आहे. तो शेवटच्या चरणांत सांगितला आहे.

जनक राजा सर्व परिग्रहांनीं गुंडाळलेला दिसत असूनहि संपूर्ण अपरिग्रही होता. उलटपक्षीं निःसंग म्हणविणारा यति हि लंगोटीच्या परिग्रहांत पुरता गुरफटलेला असणें शक्य आहे. परिग्रह मनांतून सुटला पाहिजे. केवळ बाहेरून सोडण्यानें तो सुटत नाहीं.

**घरीं कुटुंबपणें सरे । तरी वनीं वन्य होऊनि अवतरे ।**
**जो नागवीया हि शरीरें । लागला आहे ॥ —ज्ञानदेव**

म्हणून सर्व वर्णनाचा भावार्थ अभंगाच्या शेवटच्या चरणांत आहे.

(१) तुका म्हणे देवा । अवघा निरविला हेवा—

**'काम क्रोध आम्हीं वाहिले विठ्ठलीं ।**
**आवडी धरिली पायांसवें ॥ १ ॥**
**आतां कोण पाहे मागें परतोनि ।**
**गेले हारपोनि देह-भाव ॥ २ ॥'**

अपरिग्रहाचा खरा अर्थ देह-भाव नाहींसा होणें हा आहे. कारण शरीर हा च मुख्य परिग्रह आहे.

(२) ज्याचा देहभाव नाहींसा झाला आणि ज्यानें सर्व वासना

देवावर सोंपविल्या त्याच्या घरची सेवा भगवान् स्वतः करतात. त्याला लक्ष्मीची काय जरूर आहे ?

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योग-क्षेमं वहाम्यहम् ॥**

ह्या च गीतावचनाचा स्पष्ट आधार दुसरीकडे दिला आहे.

**गीतेमाजीं शब्द दुंदुभीचा गाजे ।**
**योग-क्षेम काज करणें त्याचें ॥**

(३) देवावर हवाला सोंपविणें हा च ' भिक्षेचा ' खरा अर्थ आहे. स्थूल भिक्षेचें ह्या अभंगांत मौजेनें वर्णन केलें असलें तरी महाराजांना स्थूल भिक्षा कधीं च पसंत पडली नाहीं. किंबहुना लोकांपाशीं भिक्षा मागणें म्हणजे ईश्वरावर विश्वास नसल्याची एक खूण आहे, असें त्यांनीं म्हटलें आहे. लोकांवर भार टाकणें हा भक्तीचा व्यभिचार :

**भिक्षापात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ।**
**ऐसियासी नारायणें । उपेक्षिजे सर्वथा ॥ १ ॥**
**देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरी वरी वाव ।**
**समर्पिला जीव । नाहीं, तों हा व्यभिचार ॥ २ ॥**
**जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें ।**
**हें चि अभाग्य रोकडें । मूळ हा अविश्वास ॥ ३ ॥**
**काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार ।**
**तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥ ४ ॥**

[२०]

आम्हा-घरीं एक गाय दुभताहे ।
पान्हा न सामाये त्रि-भुवनीं ॥ १ ॥
वान तें सांवळें नांव तें श्री-धरा ।
चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ २ ॥
वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय ।
कुरवाळी तो लाहे भाव-भरणा ॥ ३ ॥
चहूं धारीं क्षीर वोळली अमूप ।
धाले सनकादिक सिद्ध मुनि ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी भूक तेथें काय ।
जोगाविते माय तिन्ही लोक ॥ ५ ॥

आमच्या घरीं एक दुभती गाय आहे. तिचें दूध तिन्ही लोकांत मावत नाहीं. रंगाची सांवळी आहे. आणि नांव 'श्री-धरा.' पृथिव्यादि चौदा भुवनें हें तिचें चरण्याचें कुरण आहे. तिचें अमुक एक म्हणून वासरूं नाहीं. सर्वांची च ती माय आहे. आणि वाटेल त्याच्याबरोबर जाते. जो तिला कुरवाळील त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें भरून काढते. तिच्या चारी स्तनांतून अमूप दूध निघतें. तें पिऊन सनकादिक मुनि सिद्ध झाले. तुकाराम महाराज म्हणतात, ही माय तिन्ही लोकांना पोसायला बसली आहे, तिथें माझी ती भूक कितीशी आहे ?

तुकाराम महाराजांचा फाटका संसार पाहून कोणीं कींव प्रगट केली असेल त्याला उद्देशून ह्या अभंगांत आपल्या वैभवाचा एक मासला महाराजांनीं दाखविला आहे.

**मोक्ष-श्रिया अलंकृत। ऐसे हे संत श्रीमंत।**
**जीव दरिद्री असंख्यात। नृपति केले॥ —समर्थ**

(१) आमच्या गाईचा पान्हा तिन्ही भुवनांत मावत नाहीं—

**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्। —गीता**

हें सर्व जग मीं माझ्या एका च अंशानें भरून काढलेलें आहे.

**पादोऽस्य विश्वा भूतानि। —ऋग्वेद**

हें सर्व भौतिक विश्व म्हणजे त्याचा एक अंश आहे.

(२) चरे वसुंधरा चौदा भुवनें—

'**अत्ता चरचर-ग्रहणात्**' ह्या सूत्रांत ईश्वराचें सर्व-भोक्तृत्व वर्णिलें आहे. श्रुति गमतीनें म्हणते—

**यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदनः।**
**मृत्युर्यस्योपसेचनं क इत्था वेद यत्र सः॥ —कठ**

जो परमात्मा ब्राह्मण आणि क्षत्रिय दोघांना हि मऊ मऊ भाताप्रमाणें मटकावून टाकतो आणि प्रत्यक्ष मृत्यु हें ज्याचें तोंडींलावणें त्याला कोण ओळखूं शकतो?

(३) ह्या गाईचें अमुक म्हणून खास वासरूं नाहीं. जो कुरवाळलि त्याची ही गाय आहे—

**समोऽहं सर्व-भूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्॥ —गीता**

मी सर्वां भूतांचे ठायीं सारखा आहें. मला कोणी दोस्त नाहीं आणि दुश्मन नाहीं. पण जे प्रेमपूर्वक मला भजतात ते माझ्यांत राहतात आणि मी त्यांच्यांत राहतों.

(४) चहूं धारीं क्षीर—

चारी पुरुषार्थ ईश्वराच्या आश्रयाला राहतात.

**तैसें सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ ।**
**तो श्रीकृष्ण रावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥**
**आपुलेनि कांतेंसीं । ते जगदंबा जयापासीं ।**
**अणिमादिकीं काय दासी । नव्हती तयातें ॥**
**म्हणोनि जिया बाहीं उभा । तो लक्ष्मियेचा वल्लभा ।**
**तेथ सर्व सिद्ध स्वयंभा । येर मी नेणें ॥ —ज्ञानदेव**

(५) तो तिन्ही लोकांपुरतें द्यायला बसला तिथें मी घेऊन घेऊन किती घेणार ?

**अनंत हस्तें कमलावरानें ।**
**देतां किती घेशिल दो करानें ॥ —वामन**

[२१]

याती हीन, मज काय तो अभिमान ।
मानी तुज जन नारायणा ॥ १ ॥
काय सुख मज तयाची हे खंती ।
आपुलाला घेती गुण भाव ॥ २ ॥
द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी ।
होन जयामधीं होता गांठी ॥ ३ ॥
तुका म्हणे जन वंदितो वेगळा ।
मजसी दुर्बळा काय चाड ॥ ४ ॥

मी पडलों हीन जातीचा. मला यांत अभिमान वाळगण्यासारखें काय आहे ? लोक मला मान देतात, म्हणजे काय 'मला' मान देतात ? मी तुमचा भक्त आहें अशा समजुतीनें मान देतात. हा तुमचा च मान झाला. 'मला हे केवढा मान देतात' असें वाटून सुखांत पडण्याचें हि कांहीं कारण नाहीं. आणि मला हे कां उगाच मान देतात, अशा कल्पनेनें विह्वळ बनण्याचें हि कारण नाहीं. जो तो आपल्या मनचा कांहीं तरी गुण कल्पून घेऊन त्या कल्पित गुणाला मान देत आहे; म्हणजे पर्यायानें जो तो आपला गुण च प्रगट करीत आहे. त्यांत माझा काय संबंध निमित्तापुरता आहे. चिंधींत होन बांधलेला असल्यामुळें कोणीं चिंधी गांठीला बांधली तो काय चिंधीचा मान कीं आंतल्या होनांचा ? तुकाराम महाराज म्हणतात, लोक मला दुर्बळाला मान देतात असें मी मानत च नाहीं. ज्याला ते मान देतात तो माझ्याहून वेगळा च आहे ! मी कशाला तें आपल्याकडे ओढून घेऊं ?

तुकाराम महाराजांना जसा निंदकांचा त्रास झाला तसा पूजकांचा हि

बरा च त्रास झाला होता. हा 'भगत'-मंडळीचा त्रास त्यांना विशेष असह्य वाटत होता.

**कोठें देवा आलें अंगा थोरपण ।**
**बरें होतें दीन होतों तरी ॥ १ ॥**
**न पुसतें कोणी कोठें हि असतां ।**
**समाधान चित्ताचिया सुखें ॥ २ ॥**

उगीच मोठेपणा अंगाला चिकटला आहे. नाहीं तर कोणी पुसायला आलें नसतें आणि मनाचा आनंद भोगायला सांपडला असता.

**'लाज वाटे मज मानिती हे लोक ।**
**हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १ ॥**
**मोजुनी झिजलों मापाचिया परी ।**
**जाळावी हे थोरी लाभाविण ॥ २ ॥'**
**'पूज्य झालों अंगा आला अभिमान ।**
**पुढील कारण खोळंबलें ॥ १ ॥'**

पूज्यता अंगीं आल्यामुळें (१) उपाधि वाढते, (२) चित्ताची शांति ढळते, (३) अभिमान वाटूं लागतो आणि मग (४) सारी च प्रगति खुंटते. त्याशिवाय लोक जितका गौरव करतात त्या मानानें स्वतः-पाशीं कांहीं च नसतें म्हणजे ह्यानें दंभाचा प्रचार होतो. त्यापेक्षां मेलेलें बरें असें हि एका अभंगांत म्हटलें आहे—

**लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म-उपाव ॥ १ ॥**
**आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥ २ ॥**
**अधिकार नाहीं । पूजा करिती तैसी कांहीं ॥ ३ ॥**
**मन जाणे पापा । तुका म्हणे माय-बापा ॥ ४ ॥**

शेवटीं पूजकांच्या ह्या त्रासांतून कायमची मुक्ति महाराजांनीं शोधून काढली. त्यानें समाधान झालें.

लोक मान देतात त्याचें पृथक्करण करून त्यांनीं असें ठरविलें: हा मान माझ्या ईश्वराविषयींच्या खऱ्या अथवा कल्पित भक्तीचा आहे. चिंधीला अभिमान तरी कशाला, आणि खंती तरी कशाला? म्हणजे चाललेला सर्व सन्मान ईश्वराचा आहे. शिवाय निंदक ज्याप्रमाणें मनःकल्पित दोष माझ्यांत कल्पून माझी निंदा करतात, ती निंदा मी माझ्याकडे घेत नाहीं, कारण ती त्यांच्या च मानसिक कुभावनेची निंदा होते; तसें च पूजक मनःकल्पित गुणाबद्दल माझी स्तुति करीत असले तरी ती स्तुति मी माझ्याकडे घेण्याची जरूर नाहीं, कारण ती त्यांच्या च सद्भावनेची स्तुति आहे.

असें पृथक्करण करून महाराजांनीं स्तुति-विष पचविलें.

**निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥**
**मज हें हि नाहीं तें हि नाहीं । वेगळा दोहींपासूनि ॥ २ ॥**
**देह-भोग भोगें घडे । जें जें जोडे तें बरें ॥ ३ ॥**
**अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुकयाचें ॥ ४ ॥**

[२२]

अवघ्या वाटा झाल्या क्षीण। कळी न घडे साधन ॥
उचित विधि-विधान। न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥

भक्ति पंथ बहु सोपा। पुण्या नागवे या पापा ॥
येणें जाणें खेपा। येणोंचि एकें खंडती ॥ २ ॥

उभारूनि बाहे। विठो पालवीत आहे ॥
दासा मीचि साहे। मुखें बोले आपुल्या ॥ ३ ॥

भाविक विश्वासी। पार उतरले त्यांसी ॥
तुका म्हणे नासी। कुतर्क्याचे कपाळीं ॥ ४ ॥

कलियुगांत ईश्वरप्राप्तीचे इतर सर्व मार्ग नाहींसे झाले आहेत. त्यामुळें साधन होऊं शकत नाहीं. कर्ममार्ग हा त्यांतल्या त्यांत सोपा म्हणावयाचा. पण तो हि कलियुगांत कठिण होऊन बसला आहे. कारण कर्माचा योग्य विधि काय हें आधीं समजत नाहीं. आणि समजलें तरी हातून त्याप्रमाणें वागणें घडत नाहीं. म्हणून भक्तिमार्ग हाच सोपा मार्ग उरला आहे. ह्या मार्गाला पाप किंवा पुण्य बाधूं शकत नाहीं. ह्याच्या एकट्याच्या मदतीनें येणें-जाणें खुंटतें. हा सोपा म्हणण्याचें कारण, विठ्ठल आपण होऊन बाहू उभारून भक्तांना बोलावीत आहे. आपल्या मुखानें त्यानें प्रतिज्ञा केली आहे कीं 'माझ्या दासांना मी च तारून साहाय्य करण्यास हजर आहें.' जे भाविक ह्यावर विश्वास राखतात त्यांना त्यानें पलीकडच्या तीरावर पोंचविलें आहे. तुकाराम महाराज म्हणतात, नसते तर्क चालविणाऱ्याच्या कपाळीं मात्र नाश ठेवलेला आहे.

(१) अवघ्या वाटा झाल्या क्षीण—

‘ कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा । ’
‘ याविण आणिक असतां साधन ।
वाहतसें आण विठोबाची ॥ ’

(२) विधि-विधान कळत नाहीं—

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः । —गीता

(३) कळलें तरी घडत नाहीं—

ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ ।
रात्रंदिवस हे चि तळमळ ॥
तुका म्हणे नाहीं आपुलें बळ ।
जेणें फळ पावेन निश्चयेंसीं ॥

(४) भक्ति-पंथ बहु सोपा—

तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि ।
शाहणा तो धणी घेतो येथें ॥

(५) पाप-पुण्याचा बाध नाहीं—

यत् करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत् तपस्यसि कौन्तेय तत् कुरुष्व मदर्पणम् ॥
शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्म-बन्धनैः । —गीता

अर्थ : जें जें कांहीं करशील तें मला अर्पण कर, म्हणजे शुभाशुभांतून सुटलास.

(६) येरझारा नाहीं—

मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते । —गीता

(७) विठे पालवीत आहे—

**दोन्ही हात ठेवुनी कटी । उभा भींवरेच्या तटीं ॥**
**कष्टलासि साठीं । भक्तिकाजें विठ्ठला ॥ १ ॥**
**भागलासी मायबापा । बहु श्रम, केल्या खेपा ॥**

(८) 'दासा मी चि साहे' असें आपल्या मुखानें, म्हणजे गीतेंत, अनेक वार सांगितलें आहे :

**'योगक्षेमं वहाम्यहम् ।'**
**'न मे भक्तः प्रणश्यति ।'**
**'ददामि बुद्धियोगं तम् ।'**
**'तेषामहं समुद्धर्ता ।'**
**'मत्प्रसादात् तरिष्यसि ।'**
**'अहं त्वा सर्व-पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।'**

(९) भाव पाहिजे, तर्क नको—

**'तार्किकांचा टाका संग ।**
**पांडुरंग स्मरा रे ॥'**
**'नैषा तर्केण मतिरापनेया ।'** —श्रुति

## [२३]

**कृपाळु म्हणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें ह्यांचीं मज ॥ १ ॥**
**आणिक उपाय नेणें चि मी कांहीं । तुझें वर्म ठाईं पडे तैसें ॥ २ ॥**
**न ये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ ३ ॥**
**कृपा करिसी तरी थोडें तुज काम । माझा तरी श्रम बहु हरे ॥ ४ ॥**
**तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख । हरेल या भूक डोळियांची ॥ ५ ॥**

तूं कृपाळु आहेस म्हणून पुराणांनीं जाहीर केलें आहे. माझा त्यांच्या वचनावर संपूर्ण विश्वास आहे. तुझें वर्म पदरांत पडण्याला तुझ्या कृपेवर भरंवसा ठेवून तुला शरण येण्याशिवाय मला दुसरा उपाय माहीत नाहीं. धड वचन बोलण्याचें हि मला सामर्थ्य नाहीं. म्हणून सर्वभावानें शरण आलों आहें. तूं कृपा करावयाची म्हटलेंस तर तुला फार श्रम पडणार नाहींत, आणि माझें सर्व श्रम दूर होतील. तुकाराम महाराज म्हणतात, तुझें मुख पाहूं दे म्हणजे माझ्या डोळ्यांची भूक शांत होईल.

(१) ईश्वर कृपाळु आहे—

**'हांकेसरसी उडी । घालुनीयां स्तंभ फोडी ।**
**ऐसा कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥'**
**'कनवाळु कृपाळु भक्तांलागीं मोही ।**
**गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई**

२) बोलतीं पुराणें—

पुराणांचा आधार तुकोबांनीं पुष्कळ ठिकाणीं दिला आहे.

**पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला**
**नव्हती हे आहाच बोल । मोकळें फोल कवित्व ॥**

पुराणांत सांगितलेला अर्थ अनुभविण्याविषयीं महाराजांना तळमळ वाटे :

**पुराणींचे अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥**

(३) पुराणांतल्या किंवा संतांच्या वचनांवर महाराजांची दृढ श्रद्धा होती. ते आत्मचरित्रांत म्हणतात—

**कांहीं पाठ केलीं संतांचीं उत्तरें । विश्वासें आदरें करूनियां ॥**

लोकांचा आपल्यासारखा च विश्वास कां बसत नाहीं, ह्याचें त्यांना कोडें वाटे—

**संतांच्या वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेंचे सांगा ॥**

(४) न ये धड कांहीं बोलतां वचन—

**पाहे पां जाणिवेचेनि बळें । कोणी वेदांपासोनि असे आगळें ॥**
**कीं शेषाहूनि तोंडाळ । बोलकें आथि ॥**
**तो हि आंथरुणा तळवटीं दडे । येरु नेति नेति म्हणोनि बहुडे ।**
**येथ सनकादिक वेडे—। पिसे जाले ॥ —ज्ञानदेव**

(५) रिघालों शरण सर्वभावें—

**तमेव " शरणं गच्छ सर्वभावेन " भारत । —गीता**

(६) श्री-मुखाच्या दर्शनाची भूक विश्वरूप-दर्शनानें हि भागत नाहीं, असा भक्तराज अर्जुनाचा अभिप्राय ज्ञानेश्वर महाराजांनीं नमूद केला आहे—

**हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे ।**
**आतां होताति आर्धिले । कृष्णमूर्तीलागीं ॥**
**तें साकार कृष्णरूपडें । वांचूनि पाहों नावडे ।**
**तें न देखतां थोडें । मानितासि हे ॥**
**आम्हां भोगमोक्षांचिया ठाईं । श्रीमूर्तिवांचूनि नाहीं ।**
**म्हणोनि तैसा चि साकार होईं । हें उपसंहरीं आतां ॥**

---

[२४]

**आम्ही वैकुंठवासी । आलों ह्या चि कारणासी ।**
**बोलिले जे ऋषि । साचभावें वर्ताया ॥ १ ॥**
**झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग ।**
**उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥ २ ॥**
**अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्द-ज्ञानें ।**
**विषय-लोभी मनें । साधनें बुडविलीं ॥ ३ ॥**
**पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।**
**तुका म्हणे करा । जयजयकार आनंद ॥ ४ ॥**

आम्ही मूळचे वैकुंठांत राहणारे आहोंत. येथें आलों तें एवढ्याच साठीं कीं ऋषींनीं जें सांगून ठेविलें आहे त्याचें खऱ्या भावानें वर्तन करावें. संतांचे मार्ग आम्ही साफ करून ठेवणार आहों. कारण, आज हें सारें जग सरळ मार्ग सोडून आड रानांत भरलें आहे. संतांचें उच्छिष्ट—त्यांचें जेवण होऊन जो काय शेष भाग उरला आहे तो—खाऊन पुष्ट होऊं. पुराणांचा अर्थ पार लोपला आहे. मनें विषय-लोभी बनल्यामुळें, पुराणांतून भलभलते अर्थ काढून, सर्व साधनें बुडविण्याचा संप्रदाय रूढ झाला आहे. अशा प्रकारें कलियुग मातलें असल्यामुळें त्याला दरारा बसविण्यासाठीं आम्ही भक्तीचा डंका वाजविणार आहों. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आतां आनंदाचा प्रसंग समजून जयजयकार करा.

(१) आम्ही वैकुंठवासी—

धर्म-रक्षणासाठीं आमचा अवतार झाला आहे, असें तुकोबांनीं अनेक वार स्पष्ट सांगितलें आहे.

**‘ धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी ।**
**वाचा बोलूं वेद-नीति । करूं संतीं केलें तें ॥ ’**
**‘ धर्माचें पाळण । करणें पाखंड-खंडण**
**हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥ ’**

(२) आम्हांला नवीन कांहीं सांगावयाचें उरलेलें नाहीं. ऋषि सर्व सांगून चुकले आहेत. आतां त्याचें आचरण तेवढें करावयाचें उरलें आहे. आणि तें आम्ही करणार.

(३) संतांच्या च मार्गानें आपल्याला जावयाचें आहे. वेद, शास्त्रें, पुराणें, संत सर्वांचा मार्ग एक च आहे. पण ती वाट आतां बुजून गेल्यासारखी झाली असल्यामुळें पुनः चालू करावयाची आहे.

**विश्वीं विश्वंभर । बोले वेदांताचें सार ॥**
**जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥**
**व्यापिलें हे नारायणें । ऐसें गर्जती पुराणें ॥**
**जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥**

अशा प्रकारें सर्वांचा एक च मार्ग आहे. म्हणून—

**पुढें गेले त्यांचा शोधीत मारग ।**
**चला जाऊं माग घेत आम्ही ॥**
**वंदूं चरण-रज सेवूं उष्टावळी ।**

(४) पुराणादिकांचा भाव एका बाजूला राहून शाब्दिक पांडित्य वाढलें आहे, हें पाहून तुकोबांना सात्त्विक राग येत असे. अशांना उद्देशून खालील पंक्ति—

**‘ घोडें काय थोडें वागवितें ओझें**
**भावाविण वांझें पाठांतर ॥ ’**
**‘ साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठी ।**
**तयासी शेवटीं कडबा रे ॥**

**मालाचे पैं पेंटे वाहताती उंटें ।**
**तयांलागीं कांटे भक्षावया ॥ '**

'शाब्दिकाचें काम नाहीं येथें' म्हणून त्यांनीं त्याला सरळ हांकून लावलें आहे. आणि सर्वांना उघड बजावलें आहे कीं (आम्हांला संस्कृत मुळीं च कां येत नसेना पण)—

**वेदाचा तो अर्थ आम्हांसी च ठावा ।**
**येरांनीं वहावा भार माथां ॥**

वेदाचा काय अर्थ आम्हांला ठाऊक आहे ?—

**वेद अनंत बोलला । अर्थ इतुका चि साधिला ।**
**विठोबासी शरण जावें । निज-निष्ठा नाम गावें ॥**

(५) ह्या खऱ्या अर्थाचा, भक्तीचा, डांगोरा पिटण्यासाठीं आतां आमचा अवतार झाला आहे. म्हणून सर्वांनीं जयजयकार करावा.

**धन्य दिवस आजीं दर्शन संतांचें**

---

[२५]

**उपकारी असे आरोनि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ॥१॥**
**लाभावरी घ्यावें सांपडलें काम । आपला तो श्रम न विचारी ॥२॥**
**जीवा ऐसें देखे आणिकां जीवांसि । निखळचि रासी गुणांची च ॥३॥**
**तुका म्हणे देव तयाचा पांगिला । न भंगे संचला धीर सदा ॥४॥**

जो सर्व प्रकारें तृप्त होऊन, ('आरोनि',) आतां केवळ 'उपकारी' बनून उरला आहे, म्हणजे उपकारासाठीं च जिवंत आहे, ज्याला आपलें-परकें हा भेद नाहीं, जें म्हणून काम पडलें—मग तें किती हि कष्टाचें कां असेना—तें लाभकारक च मानतो, इतर जीवांना आपल्यासारखे च पाहतो, जो शुद्ध गुणांचा पुतळा च बनलेला आहे; तुकाराम महाराज म्हणतात, अशा पुरुषाचा देव बंदा गुलाम आहे. त्यामुळें त्याच्या रोमरोमात धैर्य मुरलें असून तें कधीं च भंगत नाहीं.

(१) केवळ उपकारापुरता उरलेल्याचें उदाहरण तुकोबांनीं स्वतःचेंच दिलें आहे—

**'अणुरणीयां थोकडा । तुका आकाशा एवढा ॥ १ ॥**
**गिळुनी सांडिलें कळिवर । भव-भ्रमाचा आकार ॥ २ ॥**
**सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता ॥ ४ ॥'**

**'धन्य ते संसारी । दयावंत जे अंतरीं ।**
**येथें उपकारासाठीं । आले, घर ज्या वैकुंठीं ॥'**

(२) आप-पर भेद नाहीं. ह्याला उपमा—

**घरींचिया उजियेड करावा । पारखिया आंधार पाडावा ।**
**हें न म्हणे चि पांडवा । दीप जैसा ॥** —ज्ञानदेव

(३) पडलें काम करणें : ह्या बाबतींत तुकोबांच्या चरित्रांत च अनेक दाखले मिळतात. जडभरताप्रमाणें, वाटेल त्यानें वाटेल तें काम तुकोबांकडून चोपून घ्यावें. त्यांना त्याचा आनंद च वाटे. एकदां कोणींसें बाजारांतून तेल आणण्यास त्यांना सांगितलें. त्यांनीं तेल आणून दिलें. तें थोडें अधिक भरलें. तेव्हांपासून जो उठला तो त्यांना च तेल आणायला सांगूं लागला. 'लाभावरी घ्यावें सांपडलें काम' ह्या त्यांच्या च वचनाप्रमाणें त्यांनीं दोन्ही हात ताठ करून जितकीं नळकांडीं हाताला बांधतां येतील तितकीं बांधून घेऊन जावीं आणि तेल आणून द्यावें. अशा प्रकारें त्यांनीं आपला देह लोकांचीं कामें करण्यांत राबविला. ह्याला च उद्देशून आत्म-चरित्रांत

**ठाकला तो कांहीं केला उपकार । केलें हें शरीर कष्टवूनि ॥**

असा उल्लेख केला आहे.

(४) सगळे जीव आपल्या जीवासारखे च—

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ —गीता**

**अर्थ : आत्मौपम्य-वृत्तीनें जो सर्वांचीं सुख-दुःखें पाहतो तो योग्यांत हि परम योगी होय.**

(५) न भंगे संचला धीर सदा—

**दैन्य-दुःखें न तपे । भय-शोकें न कंपे ।**
**देह-मृत्यु न वासिपे । पातलेयां ॥**
**आकाश हें ओसरो । पृथिवी वरी विरो ।**
**परी नेणे मोहरों । चित्त-वृत्ति ॥ —ज्ञानदेव**

(६) निर्भय वृत्तीचें कारण देवाचा आधार—

‘आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन’ —श्रुति।

‘हरीच्चिया भक्ता नाहीं भय चिंता।
दुःख-निवारिता नारायण॥ १॥
न लगे वाहणें संसार-उद्वेग।
जडों नेदी पांग देवराय॥ २॥
असों द्यावा धीर सदा समाधान।
आहे नारायण जवळीं च॥ ३॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग।
व्यापियेलें जग तेणें एकें॥ ४॥’

---

[२६]

**जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेम-खूण देऊनियां ॥१॥**
**मग मी व्यवहारीं असोनि वर्तत । जेंवि जळांआंत पद्म-पत्र ॥२॥**
**ऐकोनि नाइकें निंदा-स्तुति कानीं । जैसा कां उन्मनी योगिराज ॥३॥**
**देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टीं । स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या जेंवी ॥४॥**
**तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तो शीण वाटतसे ॥५॥**

तुझ्या प्रेमाची खूण देऊन माझ्या मनाला ज्ञानपूर्वक जड बनीव, म्हणजे मग मी खुशाल व्यवहारांत वागत राहीन. पद्म-पत्र नाहीं का जलांत राहून जलापासून अलिप्त राहत ? योगिराज उन्मनी अवस्थेमध्यें ज्याप्रमाणें कोणाचें कांहीं च समजूं शकत नाहीं, तशी लोकांची सर्व निंदास्तुति ऐकत असतां हि जणूं न ऐकल्याप्रमाणें माझी स्थिति होऊं दे. स्वप्नांतली सृष्टि जागृतींत आल्यानंतर ज्याप्रमाणें न पाहिल्यासारखी होते, त्याप्रमाणें जागेपणचा प्रपंच जागेपणीं च पाहून न पहिल्यासारखा होऊं दे. तुकाराम महाराज म्हणतात, अशी अलिप्त भूमिका प्राप्त झाल्याशिवाय कांहीं च करण्याची हौस वाटत नाहीं.

भगवद्गीतेमध्यें ज्याला ‘ ज्ञानि-भक्त ’ म्हटलें आहे तसा होण्याविषयींची उत्कंठा ह्या अभंगांत दर्शविली आहे.

(१) जाणोनि नेणतें—

ही भाषा अशी च अनेक अभंगांत आढळून येते :—

**‘ वर्ते समाधानी जाणोनि नेणता । ’**
**‘ जाणोनि नेणते जाले तेणें सुखें ।**
**न बोलोनि मुखें बोलताति । ”**

'पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत।' —श्रुति

**अर्थ : ज्ञानाचा कंटाळा करून, किंवा ज्ञान पचवून, बाल-भावानें रहावें.**

जाणतेपणा म्हणजे ज्ञान, नेणतेपणा म्हणजे भक्ति. जाणून नेणतेपणा म्हणजे ज्ञान-भक्ति.

**"जनीं 'जाणता भक्त' होऊनि राहे"।** —समर्थ

**'बहु भितों जाणपणा। आड न यो नारायणा।**
**घेईन प्रेम-पान्हा। भक्ति-सुख निवाडें॥'**

ज्ञान-भक्तीची कल्पना महाराष्ट्रीय संतमंडळाचे आचार्य ज्ञानेश्वर महाराज ह्यांनीं च सर्वांना शिकविली आहे—

**'माझिये सहज-स्थिती। भक्ति नाम॥'**

**'जे नेणणें माझें प्रकाशोनि। अन्यथात्वें मातें दावूनि।**
**सर्व हि सर्वीं भजोनि। बुझावीतसे॥**
**एवं घेऊन अज्ञानातें। माझी भक्ति जे हे वर्ते।**
**ते दावी मज द्रष्ट्यातें। दृश्य करूनि॥'**

**'ऐसा बोध चि केवळ। जो होऊन असे निष्कळ॥**
**तया हि वरी भजन-शीळ। माझां ठाईं'॥**

**'कैवल्याचा अधिकारी। मोक्षाची सोडी-बांधी करी॥**
**कीं जलाचिया परी। तलवट घे॥' इ.** —ज्ञानदेव

प्रेम-सुख अनुभवण्यासाठीं, आणि जगाला वांटण्यासाठीं ज्ञान विसरावयाचें.

**अभेदूनि भेद राखियेला अंगीं। वाढवाया जगीं प्रेम-सुख॥**

(२) 'जाणोनि नेणता बनणें' ह्याचा ईश्वराला जाणून पुन्हां नेणता बनणें हा एक अर्थ झाला. पण जगांतले व्यवहार जाणत असून न जाणणें हा दुसरा अर्थ हि त्याचा होऊं शकतो. आणि पुढें दिलेला पद्म-पत्राचा दृष्टान्त त्या च अर्थानें लागू करावयाचा आहे. योग्याच्या अवस्थेला 'उन्मनी' म्हणतात. भक्ताच्या अवस्थेला 'सहज-स्थिति' हें नांव आहे. उन्मनी-मध्यें सृष्टीची ओळख च नाहीं. सहज-स्थितीमध्यें ओळख असून ओळख नाहीं. 'उन्मनी' विशिष्ट काळापुरती आहे. 'सहज-स्थिति' नंतरची आहे. उन्मनी ही ज्ञान-भूमिका आहे. सहज-स्थिति ही त्याच्या पुढची भक्ति-भूमिका आहे.

[२७]

**भूतीं देव म्हणोनि भेटतों या जना। नाहीं हे भावना नर-नारी ॥१॥**
**जाणे भाव पांडुरंग अंतरींचा। न लगे द्यावा साचा परिहार ॥२॥**
**दयेसाठीं केला उपाधि-पसारा। जड जीवा तारा नाव कथा ॥३॥**
**तुका म्हणे नाहीं पडत उपवास। फिरतसें आस धरोनियां ॥४॥**

मी ह्या लोकांना भेटतों तो 'देव'—भावनेनें भेटतों. हा पुरुष, ही स्त्री असली भेद-बुद्धि माझ्या जवळ नाहीं. अंतःकरणांतला भाव ईश्वराला माहीत आहे. सत्याला आपला बचाव करीत बसण्याची जरूर नाहीं. मीं ही सारी उपाधि कां वाढवून ठेवली आहे?—जडजीवांची दया येते म्हणून. जडजीवांना तारणारी हरि-कथा ही नौका आहे. म्हणून मी हरि-कथेचा 'पसारा' घालतों. नाहीं तर ह्या भानगडींत मी कशाला पडलों असतों? तुकाराम महाराज म्हणतात, हा मी एवढा आशा धरून भटकत फिरतों, कीर्तनाचा पसारा घालतों, ज्याला त्याला भेटतों, तें आपलें मला उपवास पडत होते म्हणून करतों असें समजतां कीं काय?

(१) 'भूतीं देव म्हणोनि भेटतों ह्या जनां'—

**'जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत।**
**हा भक्ति-योग निश्चित। जाण माझा॥'** —ज्ञानदेव

**'तुका म्हणे जें जें भेटे। तें तें वाटे मी ऐसें॥'**
**'भूतीं भगवंत। हा तो जाणतों संकेत॥'**
**'भूत-मात्रीं हरीविण। न पाहे चि दुजेपण॥'**

(२) नाहीं हे भावना नर-नारी—

**‘नर नारी बाळें अवघा नारायण। ऐसें माझें मन करीं देवा॥’**

**‘त्वं स्त्री त्वं पुमानसि। त्वं कुमार उत वा कुमारी॥**
**त्वं जीर्णो दण्डेन अञ्चसि। त्वं जातो भवसि विश्वतोमुखः॥’** —श्रुति

तूं स्त्री आहेस, तूं पुरुष आहेस, तूंच मुलगा आणि तूंच मुलगी, तूंच म्हातारा बनून हातांत काठी घेऊन चालतोस. आणि बालकरूपानें तूंच जन्माला येतोस. असा तूं विश्व-व्यापक आहेस.

(३) जाणे भाव इ०—

ह्यांत महाराजांनीं आपल्या म्हणण्याच्या सत्यत्वाबद्दल पांडुरंगाची साक्ष दिली आहे—

**कळावें तयासि कळे अंतरींचें।**

‘परिहार’ म्हणजे बचाव किंवा आत्मसमर्थन.

सत्याला समर्थनाची अपेक्षा नाहीं.

(४) ‘दयेसाठीं’ उपाधि—

संतांचा उद्योग, ‘पसारा’, भूतदयेनें प्रेरित असतो.

**‘भूतांची दया हें भांडवल संतां।’**

**‘अवतार तुम्हां धराया कारण।**
**उद्धरावे जन जड जीव॥’**

तुकाराम महाराजांना लोकांविषयीं फार कळवळा वाटे. त्यामुळें ‘सकळांच्या पायां माझे दंडवत’ येथपासून तों ‘तुका म्हणे त्याच्या हाणा तोंडावरी’ येथपर्यंतची भाषा त्यांनीं वापरली आहे. अंतर्बाह्य पांडुरंगमय झालेल्या सत्पुरुषाचा हा ‘स्वभाव-सिद्ध’ अधिकार आहे—

**जन तरी आम्हां देव । परि हा निंदितो स्वभाव ॥**
**येतो हिताचा कळवळा । पडती हातीं म्हणोनि काळा ॥**

ह्या सर्व-भूत-हिताच्या कळवळ्यानें त्यांनीं जन्मभर उपाधि पतकरली. उपाधि कसली ?—हरिकथेची.

(५) जड जीवा तारा नाव कथा—

**दीन आणि दुर्बळांसी । सुख-राशि हरि-कथा ॥ १ ॥**
**तारूं भव-सागरींचें । उंच नीच अधिकारी ॥ २ ॥**
**चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनि ॥ ४ ॥**

(६) शेवटच्या चरणांत 'आमचें कांहीं ह्या उद्योगावांचून अडलें नाहीं,' असा इशारा नमूद केला आहे. माप भरल्यानंतर बाहेर सांडणें स्वाभाविकच आहे.

**तुका म्हणे माप भरूं आलें सिगे । धारबोळ गंगे पूर वाहे ॥**

[२८]

**माझे तों स्वभाव मज अनावर ।**
**तुज हि देतां भार कांहीं नव्हे ॥ १ ॥**
**ऐसें कळों आलें मज नारायणा ।**
**जागृती या स्वप्ना ताळ नाहीं ॥ २ ॥**
**संपादितों तो हा अवघा बाह्य रंग ।**
**तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे सत्या नाहीं पाठी-पोट ।**
**असतें निघोट एक-जाति ॥ ४ ॥**

मी एवढा प्रयत्न करतों तरी माझ्या सूक्ष्म वासना अजून माझ्या ताब्यांत आलेल्या नाहींत, आणि तुझ्यावर भार टाकून हि स्थिति आहे तशी च आहे, असें आतां माझ्या लक्षांत आलें आहे. कशावरून म्हणशील तर हें च पहाना—माझ्या जागृतींतल्या आणि स्वप्नांतल्या अनुभवांचा कोठें मेळ बसला आहे ? त्यावरून एवढेंच समजावयाचें कीं जो काय मी प्रयत्न करतोंसें भासतें तो सारा वरवरचा आहे, आणि तुझ्यावर भार टाकणें हि तितपत च. खरा जिव्हाळा अजून अंतःकरणांत उत्पन्न झालेला नाहीं. 'स्वप्नाकडे कशाला पाहतोस ? जागृतींत वासना जिंकल्या म्हणजे जिंकल्या,' असें म्हणावें तर तुकाराम महाराज म्हणतात, तें बरोबर नाहीं. कारण, सत्याला पाठपोट थोडें च आहे ? सत्य जें जागृतींत तें च स्वप्नांत हि तसें च असलें पाहिजे. सत्य शुद्ध एक-जात असतें.

केवळ जागृति जिंकली म्हणजे तेवढ्यानें कार्यभाग होत नाहीं. स्वप्न हि जिंकलें पाहिजे. 'निजों तरी जागे' अशी स्थिति येईल तेव्हां च जिंकल म्हणावयाचें, हा ह्या अभंगाचा मुद्दा आहे.

अनुमानाची शली अशी :—

(१) आत्म-प्रयत्न आणि ईश्वर-शरणता हीं दोन स्वभाव-जयाचीं साधनें संतांनीं व शास्त्रकारांनीं सांगितलीं आहेत.

(२) हीं दोन्ही साधनें माझ्या आचरणांत आणण्याचा मी प्रयत्न करतों.

(३) त्यानें जागृतीपुरता मीं माझा स्वभाव जिंकला आहे असा प्रत्यय येतो.

(४) पण स्वप्नें अजून ताब्यांत येऊं शकलीं नाहींत.

(५) ह्यावरून तीन कल्पना होऊं शकतात :—

(अ) स्वप्नांचें महत्त्व नसेल. स्वप्नांत कांहीं आलें तरी त्यानें जागृतीचा अनुभव बाधित होत नसेल.

(आ) माझा प्रयत्न नीट, पुरता, किंवा खरा नसेल.

(इ) शास्त्रकारांचें व संतांचें सांगणें चुकीचें असेल.

(६) पैकीं तिसरी कल्पना मनाला हि शिवूं नये. कारण (i) त्यांत अश्रद्धा आहे. (ii) इतर दोन कल्पना चुकीच्या ठरल्याशिवाय ही तिसरी कल्पना एकदम गृहीत धरण्यांत तर्कदोष आणि उतावळ आहे. (iii) आत्म-प्रयत्न आणि ईश्वर-शरणता दोन्ही साधनें रद्दी ठरलीं म्हणजे तिसरें साधन उरत नसल्यामुळें केवळ निराशा-वाद उरतो. म्हणून ह्या तिसऱ्या कल्पनेचा विचार सोडून द्यावा.

(७) स्वप्नाचा जागृतीशीं कांहीं संबंध लावण्याची जरूर नाहीं, ही पहिली कल्पना हि सत्याच्या व्याख्येला जमत नाहीं. सत्य म्हटलें म्हणजे तें सदा सर्वत्र सर्व परिस्थितींत एकरूप असलें पाहिजे. सत्याला जागृति स्वप्न हा भेद कां असावा ?

(८) म्हणून मधली कल्पना उरते आणि ती च मी ग्राह्य समजतों. खोल आत्मपरीक्षण करून पाहतां हि असें दिसून येतें कीं माझा आत्म-प्रयत्न आणि ईश्वर-शरणता दोन्ही वरवरचीं आहेत, आंतल्या जिव्हाळ्याचीं नाहींत.

आत्म-प्रयत्न आणि ईश्वरशरणता हीं दोन स्वभाव-ज्याचीं साधनें गीतेंत सांगितलीं आहेत:

(१) **मामनुस्मर युद्ध्य च ।**

माझें स्मरण कर, आणि झगडत रहा.

(२) **विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः । रसवर्ज...**

इंद्रिय-संयमानें विषय आवरतात. पण गोडी उरते. पुढें—

**रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥**

ईश्वर-दर्शनानें गोडी हि जाते.

(३) **योगं युञ्जन् मदाश्रयः ।**

योग आणि ईश्वर-शरणता.

४) **मामाश्रित्य यतन्ति ये ।**

माझा आश्रय करून जे प्रयत्न करीत राहतात ( ते च ब्रह्माला गांठतात.)

(५) **तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**

पद्धतशीर रीतीनें इंद्रिय-संयमाचा प्रयत्न करावा, आणि मत्परायण-वृत्तीनें रहावें.

---

[२९]

तुज-ऐसा कोणी न देखें उदार ।
अभय-दान-शूर पांडुरंगा ॥ १ ॥

शरण येती त्यांचे न विचारिसी दोष ।
न मागतां त्यांस अढळ देसी ॥ २ ॥

धांवसी आडणीं ऐकोनियां धांवा ।
कइवारें देवा भक्तांचिया ॥ ३ ॥

दोष त्यांचे जाळी कल्प-कोटीवरी ।
नामासाठीं हरी आपुलिया ॥ ४ ॥

तुका म्हणे तुज वाणूं कैशापरी ।
एक मुख हरी आयुष्य थोडें ॥ ५ ॥

तुझ्यासारखा उदार दुसरा कोणी दिसत नाहीं. पांडुरंगा, तूं अभय-दान देणारा खरा शूर आहेस. एक तर शरण येणारांच्या गुण-दोषांचा विचार करीत नाहींस, आणि न मागतां हि शाश्वत पद देतोस. अड-चणीच्या प्रसंगीं कोणीं धावा केला कीं त्यासाठीं उडी घालतोस. भक्तांच्या कैवारानें हें सारें तूं करतोस. भक्ताचीं मागल्या कोटि कल्पांपर्यंतचीं सर्व पापें, त्यांच्या एका नाम-स्मरणावर खूष होऊन, जाळून टाकतोस. अशा तुझ्या अद्वितीय चरित्राचें मी कसें वर्णन करूं ? वर्णन करायला तोंड एकलें एकच आणि आयुष्य हि अपुरें. म्हणून तुकाराम महाराज येथें च वर्णन संपवितात.

(१) तुजऐसा कोणी न देखें उदार—

'ऐसो को उदार जगमाहीं ।
बिनु सेवा जो द्रवइ दीनपर, रामसरिस कोउ नाहीं ॥' —तुलसीदास

'तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र ।
पैं कैवल्य ऐसें पवित्र । वैरियां हि दिधलें ॥
मोक्ष दुराराध्य कीर होए । परी तो हि आराधी तुझे पाय ।
म्हणोनि धाडिसी तेथ जाए । पाइक जैसा ॥
ऐसा अपकारिया तुझा उपकार । तूं अपात्रीं हि परी उदार ॥'
—ज्ञानदेव

(२) 'अभयदान-शूर' पांडुरंग—

'दान-शूर' पुष्कळ आहेत. पण 'अभयदान-शूर' देव च आहे. सर्व दानांमध्यें अभय-दान श्रेष्ठ आहे. आणि तें देण्याचें सामर्थ्य एका ईश्वराचें च आहे. म्हणून च ज्ञानेश्वर महाराजांनीं ईश्वराचें औदार्य 'स्वतंत्र' म्हटलें आहे.

हरीच्या दासां भय । ऐसें बोलों तेंही नये ॥ १ ॥
राहोनियां आड । उभा देव पुरवी कोड ॥ २ ॥
हरीच्या दासा चिंता । अघटित हे वारता ॥ ३ ॥
खावें ल्यावें द्यावें । तुका म्हणे पुरवावें ॥ ४ ॥

'दीप घेऊनियां धुंडित अंधार ।
भेटे हा विचार अघटित ॥ १ ॥
विष्णुदास आम्ही न भिओं कळिकाळा ।
भूलों मृगजळा न घडे तें ॥ २ ॥'

(३) शरण येती त्यांचे इ०—

'तुवां सनकादिकांचेनि मानें । सायुज्या सौरस दिधला, पूतने
जे विषाचेनि स्तनपानें । मारों आली ॥' —ज्ञानदेव

(४) न मागतां त्यांस अढळ देसी—

'अढळपद' हा ध्रुवाचा संदर्भ आहे.

**आणि उत्तान-चरणाचिया बाळा । काय ध्रुव-पदीं चाड ॥**
**तो वना आला या चि लागीं । जें बैसावें पितयाचिया वोसंगीं ॥**
**कीं तो चंद्र-सूर्यादिकांपरिस जगीं । श्लाघ्य केला ॥ —ज्ञानदेव**

(५) धांवसी आडणीं इ०—

**सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ।**
**उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥ —समर्थ**

(६) दोष त्यांचे जाळी इ०—

**'पुत्र आळवितां अजामिळ । आपणपें देसी ॥'**
**'तूंतें आराधी ना आइके । होती पुंसा बोलवीत कवतिकें**
**तिये वैकुंठीं तुवां गणिके । सुरवाड केला ॥' —ज्ञानदेव**

**'अजामेळ पापी वदे पुत्रकामें**
**तया मुक्ति नारायणाचेनि नामें ।**
**शुकाकारणें कुंटणी 'राम' वाणी**
**मुखें बोलितां ख्याति झाली पुराणीं ॥' —समर्थ**

(७) तुका म्हणे तुज वाणूं कैशापरी इ०—

**ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुति–शास्त्रां मौन पडे ॥ १ ॥**
**तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुति ॥ २ ॥**
**शिणलीं सहस्र तोंडें । शेष-फणीऐसें धेंडें ॥ ३ ॥**
**तुका म्हणे मही । पत्र, सिंधु न पुरे शाई ॥ ४ ॥**

'मही-पत्र' इ. हा महिम्नाचा संदर्भ आहे:

**'असित-गिरि-समं स्यात् कज्जलं सिन्धु-पात्रे**
**सुर-तरु-वर-शाखा लेखनी पत्रमुर्वी ।**

लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्व-कालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति ॥' —महिम्नस्तोत्र

'तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मति ।
राहिल्या श्रुति मौनपणें ॥
मौनपणें वाचा थोटावल्या चारी
ऐसें तुझें हरि रूप आहे ॥'

'स्तुति करूं तरी न ये चि या वेदा
तेथें माझा धंदा कोणीकडे ॥'

'तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं
दुजा कोणी तिहीं त्रिभुवनीं ॥
सहस्र-मुखें शेष शिणला बापुडा ।
चिरलिया धडा जिह्वा त्याच्या' ॥ इ. इ.

'पाहे पां जाणिवेचेनि बळें । कोण्ही वेदापासूनि असे आगळें ।
कीं शेषाहूनि तोंडाळें । बोलकें आथि
तो हि आंथुरणातळवटीं दडे । येरू 'नेति नेति' म्हणोनि बहुडे ।
येथ सनकादिक वेडे–। पिसे जाले ॥ —ज्ञानदेव

[३०]

**भक्तांहूनि देवा आवडतें काई । त्रिभुवनीं नाहीं आन दूजें ॥ १ ॥**
**नावडे वैकुंठ क्षीराचा सागर । धरोनि अंतर राहे दासां ॥ २ ॥**
**सर्वभावें त्यांचें सर्वस्वें ही गोड । तुलसीदळ कोड करुनी घ्यावें ॥ ३ ॥**
**सर्वस्वेंसीं त्यांचा म्हणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या४॥**
**तुका म्हणे भक्ति-सुखाचा बांधिला । आणिक विठ्ठला धर्म नाहीं ॥५॥**

देवाला भक्त अत्यंत प्रिय आहे. त्याहून अधिक प्रिय अशी एक हि वस्तु तिन्ही लोकांत नाहीं. वैकुंठ आणि क्षीरसागर म्हणजे देवाच्या लाडक्या जागा म्हटल्या आहेत. पण त्या हि देवाला दासांच्या हृदयांपुढें तुच्छ वाटतात. म्हणून तो दासांचें अंतःकरण धरून बसतो. त्यांनीं सर्व-भावानें अर्पण केलेलें तुळसीचें एक पान हि त्याला सर्वस्व वाटतें. आणि तें तो मोठ्या कौतुकानें गोड करून घेतो. तो आपल्याला सर्व प्रकारें भक्तांचा 'बंदा' म्हणवून घेतो. आणि त्यांच्या बोलण्याप्रमाणें चालतो. तुकाराम महाराज म्हणतात, देव भक्तिप्रेमाचा बांधलेला आहे. तो अवांतर धर्म ओळखत नाहीं.

(१) देवाला भक्त किती आवडतो आहे हें भगवंतांनीं गीतेंत स्वमुखानें पुनः पुनः सांगितलें आहे. बारावा अध्याय आणि त्यावरील ज्ञानदेवांचें अमृत-मधुर व्याख्यान पहा—

यो मे भक्तः स मे प्रियः । श्लोक १४

**अर्जुना तो भक्त । तो चि योगी तो चि मुक्त ।**
**तो वल्लभा मीं कांत । ऐसा पढिये ॥**
**हें ना तो आवडे । मज जीवाचेनि पाडें**
**हें हि येथ थोकडें । रूप करणें ॥**

स च मे प्रियः । श्लोक १५

तरि तयाचा गा मज मोहो । काइ सांगों तो पढियावो
हें असो जीवीं जीवो । माझेनि तो

यो मद्भक्तः स मे प्रियः । श्लोक १६

तयाचे आम्हां व्यसन । आमुचें तो निजध्यान
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥

भक्तिमान् यः स मे प्रियः । श्लोक १७

तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें
नाहीं गा साचोकारें । तुझी आण ॥

भक्तिमान् मे प्रियो नरः । श्लोक १९

म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुगुट करूं
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही ॥
तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणी
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेवूं ॥
तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे
हातींचेनि लीला-कमळें । पूजूं तयातें ॥
दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी
आलिंगावया लागोनि । तयाचें आंग ॥
तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे
किंबहुना आवडे । निरुपम ॥

भक्तास्तेऽतीव मे प्रियाः । श्लोक २०

पार्था गा जगीं । ते चि भक्त ते चि योगी
उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥
आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन
ते वांचूनि आन । गोमटें न मनूं ॥

(२) नावडे वैकुंठ इ०—

'नाहं वसामि वैकुण्ठे योगिनां हृदये रवौ ।
मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥'
तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानु-बिंबीं हि न दिसें
वरि योगियांचीं हि मानसें । उमरडोनि जायें ॥
परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा
जेथें नामघोष बरवा । करिती माझा ॥ —ज्ञानदेव

(३) 'सर्वभावे' इ०—

तुकाराम महाराजांच्या ह्या अभंगावर ज्ञानेश्वरीची संपूर्ण छाप आहे. 'पत्रं पुष्पं' ह्या श्लोकाच्या टीकेंत ज्ञानेश्वर म्हणतात:—

'हें असो काइसीं फुलें । पान चि एक आवडतें जालें
तें साजुक हि न हो सुकलें । भलतैसें ॥
परी सर्व-भावें भरलें देखें । आणि भुकेला अमृतें तोखे
तैसें पत्र चि परी तेणें सुखें । आरोगूं लागें ॥'
'रुक्मिणीनें एक्या तुळशिदळानें ।
गिरिधर प्रभु तुळिला ॥'

(४) देव भक्ताचा विकलेला आहे, हें हि देव च बोलून गेले आहेत. 'योग-क्षेमं वहाम्यहम्' हा 'मॅग्ना चार्टा' प्रसिद्ध च आहे.

तयां माझिया सायुज्याची चाड । तरी तें चि पुरवीं कोड
कां सेवा म्हणती तरी आड । प्रेम सूयें ॥
ऐसा मनीं जो जो धरिती भावो । तो पुढांपुढां लागे तयां देवों
आणि दिधलियाचा निर्वाहो । मी चि करीं ॥
हा योग-क्षेम आघवा । तयांचा मज चि पडिला पांडवा
जयांचिया सर्वभावा । आश्रय मी ॥ —ज्ञानदेव

(५) 'भक्ति' हा च परम-धर्म आहे. अवांतर धर्म देव जाणत नाहीं—

'सर्व-धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज
अहं त्वा सर्व-पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥' —गीता

'तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय ।
आणिक उपाय दुःख-मूळ ॥'

[३१]

**पवित्र होईन चरित्र-उच्चारें ।**
**रूपाच्या आधारें गोजिरीया ॥ १ ॥**
**अपुरती बुद्धि पुण्य नाहीं गांठीं ।**
**पायीं घालीं मिठी पाहें डोळां ॥ २ ॥**
**गाईन ओंविया शिष्टांच्या आधारें ।**
**सारीन विचारें आयुष्या या ॥ ३ ॥**
**तुका म्हणे तुझें नाम नारायणा ।**
**ठेवीन मी मना आपुलीया ॥ ४ ॥**

तुमच्या चरित्राचा उच्चार करून आणि तुमच्या सुंदर रूपाचें ध्यान करून मी पवित्र होईन, असा मला विश्वास वाटतो. ज्ञानमार्गानें जाण्याला माझी बुद्धि पुरेशी नाहीं. आणि कर्ममार्गांतली अनुकूलता हि पूर्वपुण्या-वांचून थोडीच प्राप्त होणार आहे ? म्हणून तुमचें रूप डोळ्यांनीं पहावें आणि पाय घट्ट धरून ठेवावे ह्याशिवाय मला दुसरा उपाय नाहीं. पूर्व-संतांच्या आधारानें मी चार वेडेवांकडे बोल गाईन आणि तुमच्या चरित्राच्या चिंतनांत आयुष्याचे चार दिवस असतील नसतील ते सारीन. तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा ! मी माझ्या मनाला तुझें च नांव ठेवीन, म्हणजे मनांत तुझ्या नामाशिवाय कशाचें हि चिंतन करणार नाहीं.

(१) ‘ पवित्र होईन चरित्र-उच्चारें ’—

**हीन आणि दुर्बळांसि । सुखरासि हरिकथा ॥ १ ॥**
**तारूं भव-सागरींचें । उंच नीच अधिकारी ॥ २ ॥**
**चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥**
**तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनि ॥ ४ ॥**

'गोकुळांत भगवंतांनीं केलेलें चरित्र गावें' त्यानें मन पवित्र होतें, असा अनुभवसिद्ध उपदेश 'दीन आणि दुर्बळ' लोकांना महाराजांनीं केला आहे. त्यांनीं स्वतः भगवंतांच्या बाल-चरित्रावर एक अभंग-शतक लिहिलें आहे.

(२) नाम-रूपें मिथ्या खरीं; पण देवाचें नाम आणि देवाचें रूप हीं मात्र सत्य आहेत.

**'बिभ्रद् वपुः सकल-सुन्दर-संनिवेशं**
**कर्माचरन् भुवि सुमङ्गलमाप्त-कामः ।' —भागवत**
**'सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें ।**
**उभें पंढरीचें विटेवरी ॥ १ ॥**
**डोळियांची धणी पाहतां न पुरे ।**
**तयालागीं झुरे मन माझें ॥ २ ॥**
**प्राण निघों पाहे कुडिये सांडूनि ।**
**श्रीमुख नयनीं न देखतां ॥ ३ ॥**
**चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें ।**
**तुका म्हणे येणें गरुड-ध्वजें ॥ ४ ॥**

वेदांमध्यें ईश्वराला 'सु-रूप-कृत्नु' म्हणजे 'सुरूप सृष्टि बनविणारा,' असें विशेषण लावलें आहे. सुंदर सृष्टि निर्मिणारा स्वतः किती सुंदर असेल ?

(३) 'अपुरती बुद्धि'—

ईश्वराचें ज्ञान हा बुद्धीच्या पलीकडचा विषय आहे. प्रत्यक्ष आणि अनुमान ह्या दोन पात्यांच्या जोरावर तर्काची कातर काम करणार. पण ह्या कातरीचीं दोन्ही पातीं ईश्वरावर चालूं शकत नाहींत.

**नैषा तर्केण मतिरापनेया । —श्रुति**

ईश्वरी ज्ञान ही तर्कानें प्राप्त होणारी गोष्ट नव्हे.

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । —श्रुति**

प्रवचनांनीं, बुद्धीच्या जोरावर, किंवा बहु-श्रुतपणानें आत्मप्राप्ति होणार नाहीं

म्हणून ज्ञान-मार्ग म्हणजे केवळ अहंकार च आहे.

**ज्ञानियांच्या घरीं चोजवितां देव**
**तेथें अहंभाव पाठी लागे ॥**

(४) ‘ पुण्य नाहीं ’—

कर्ममार्गाला अनेक प्रकारच्या साधनांची अनुकूलता लागते. ही अनुकूलता दुर्लभ. त्यांतून ‘ कलियुगांत ’ तर सरासरी अलभ्य च.

**अवघ्या वाटा झाल्या क्षीण । कळीं न घडे साधन**
**उचित विधि-विधान । न कळे घडे सर्वथा**

म्हणून मी आपली तुझ्या ‘ पायीं मिठी घालीन ’. जणूं काय ह्याला कांहीं च ‘ पुण्य गांठी ’ असावें लागत नाहीं !

**‘ बहुता सुकृताची जोडी । म्हणुनि विठ्ठलीं आवडी ॥ ’ ज्ञानदेव**
**‘ काय ऐसें पुण्य होईल गांठी । घालिन पायीं देवाचे मिठी ॥ ’**
**—तुकाराम**

जन्मोजन्मीं पुण्य-संचय केला असल्याशिवाय ‘भाव’ उत्पन्न होत नाहीं. पण मुद्दा असा आहे कीं कर्म ज्याप्रमाणें साधन-सापेक्ष आहे, तसा ‘भाव’ नाहीं. जो इच्छा करील त्याला साध्य आहे. म्हणून ‘सुलभ’ म्हणावयाचा. बाकी तो झाला तरी ‘ राम कृपा बिनु सुलभ न सोई ’ आहे च !

(५) ‘ गाईन ओंविया शिष्टांच्या आधारें ’—

पूर्वसंतांचा आधार घेऊन आपण पावलें टाकूं या.

**पुढें गेले त्यांचा शोधीत मारग ।**
**चला जाऊं माग घेत आम्ही ॥**

महाराज आपल्या अभंगांना 'ओंविया' म्हणतात.

**आतां गाऊं तुज ओंविया मंगळीं ।**
**करूं गदारोळीं हरि-कथा ॥**

(६) 'सारीन विचारें आयुष्या या'---

मुखानें देवाचें चरित्र गावें आणि त्याबरोबर त्या चरित्राचें चिंतन करावें, असें अंतर्बाह्य अनुसंधान झालें पाहिजे.

(७) 'तुका म्हणे तुझें नाम' इ०—

मनाला नारायणाचें नांव ठेवणें म्हणजे मन नारायणमय करणें. मनाला काय जें ठेवावें तें त्याचें नांव. ह्या मनाच्या स्वभावाचा फायदा आपण घ्यावा.

**कां यया मनाचें एक निकें । जें देखिलिया गोडीचिया ठाया सोकें ।**
**म्हणोनि अनुभव-सुख चि कवतिकें । दावीत जाइजे ॥ —ज्ञानदेव**

---

## [३२]

कोणाच्या आधारें करूं मी विचार ।
कोण देईल धीर माझ्या जीवा ॥ १ ॥
शास्त्रज्ञ पंडित नव्हें मी वाचक ।
याति-शुद्ध, एक ठाव नाहीं ॥ २ ॥
कलियुगीं बहु कुशळ हे जन ।
छळितील गुण तुझे गातां ॥ ३ ॥
मज हा संदेह झाला दोहीं सवा ।
भजन करूं देवा किंवा नको ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां दुरावितां जन ।
किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ५ ॥

कोणाच्या आधारानें मीं विचार करावा ? आणि मला धीर देणारा तरी कोण आहे ? बरें, आधाराशिवाय माझें चालणार तरी कसें ? मी कांहीं शास्त्रज्ञ नाहीं कीं बुद्धिमान् पंडित नाहीं, अथवा ग्रंथ हि वाचलेला नाहीं आणि जातीचा हि हीन. मिळून मला आधाराला एक हि जागा उरली नाहीं. त्यांतून कलियुगांत लोक मोठे कुशल झाले आहेत. देवाचे गुण गावयास बसावें तर नाना प्रकारचे वाद घालून छळ करतात. मला तर आतां हा च विचार पडला आहे : भजन करणें बरें कीं सोडून देणें बरें ? तुकाराम महाराज म्हणतात कीं आतां एक तर लोकांना दूर केलें पाहिजे, नाहींपक्षीं मरण पतकरलें.

(१) साधकाच्या साधनेंत अशी एक अवस्था येते कीं ज्या वेळीं त्याला पुढें विचार करण्याला कांहीं तरी आधार किंवा आलंबन लागतें. अशा आधाराशिवाय धीर खचतो, निश्चय डळमळूं लागतो, आपण करतों

तें बरोबर कीं चूक अशी शंका येऊं लागते. ही कसोटीची वेळ असते. ह्या वेळेस जर हिंमत टिकली तर पुढें प्रगति होते. नाहीं तर मनुष्य खालीं पडतो. हें खालीं पडणें तो जितक्या अधिक उंचीवर चढला असेल त्या प्रमाणांत क्लेशकारक होतें.

(२) अशा वेळीं मनुष्य बहुधा आधारासाठीं शास्त्रें धांडोळूं लागतो किंवा एखाद्या कर्मकांडाच्या क्लृप्तीचा आश्रय घेतो. पण तुकाराम महाराज म्हणतात कीं मी याति-हीन असल्यामुळें, आणि विद्या-साधनांपासून अलिप्त असल्यामुळें हा हि आधार मला नाहीं. तुकाराम महाराज म्हणतात, हा आधार नव्हता हें फार चांगलें झालें. कारण बहुधा मनुष्य शास्त्रांच्या किंवा कर्मकांडांच्या जाळ्यांत सांपडला म्हणजे खऱ्या श्रेयो-मार्गाला मुकतो. त्यांनीं स्वतःच असें म्हटलें आहे :—

**बरा देवा कुणबी केलों । नाहीं तर दंभें असतों मेलों ।**
**भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥**
**विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥**
**सेवा चुकतों संतांची । नागवण हे फुकाची ॥**

(३) अशा प्रकारें तुकाराम महाराज कांहीं तरी आलंबनासाठीं तळमळत असतां इकडे ‘कलियुगांतल्या कुशल’ जनांनीं महाराजांना त्यांच्या मार्गावरून परावृत्त करण्यासाठीं कसून मेहनत केली असें दिसतें.

**पाखंड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥**
**न कळे तें मज पुसती छळूनि । लागतां चरणीं न सोडिती ॥**
**तुका म्हणे खीळ पडो त्यांच्या तोंडा । किती बोलों भांडा वादकांसी ॥**

‘दगडाची पूजा करून काय होतें ? शरीर हें च देवाचें मंदिर आहे’, ‘शरीर रक्षावें हा धर्म बोलती’, ‘देवळांत कशाला जावें ? देव घरीं च नाहीं का ?’ इ. इ.

**कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शब्द-ज्ञानें देवा नाश केला ॥**
**आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न सांगतां बुडूं पाहें ॥**
**बुडविली भक्ति म्हणती 'पाषाण'। पिंडाचें पाळण स्थापुनीयां ॥**
**'न जावें देउळा,' म्हणती, 'देव घरीं'। बुडविलें यापरी तुका म्हणे ॥**

(४) 'कुशल' लोक क्षणभर तुकोबांना हि साशंक करूं शकले असें दिसतें. क्षणभर 'भजन करूं कीं नको करूं', अशी शंका त्यांना आली.

(५) त्यामुळें त्यांनीं लोकांना 'दूरविण्याचा' निश्चय केला.

**न करावा संग । वाटे दूरवावें जग ॥**
**सेवावा एकांत । वाटे न बोलावीं मात ॥**
**जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥**

'धनाला' आणि 'तनाला' तर त्यांनीं केव्हां च वमन लेखलें होतें, पण 'जनाला' हि त्या च कोटींत लेखण्याची त्यांनीं खूण-गांठ बांधली.

**लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संतसंग ॥**

अल्प-श्रद्धेच्या माणसाला लोक परमार्थ पचनीं पडूं देत नाहींत. म्हणून लोकांचा छंद सोडून देण्याविषयीं त्यांनीं स्पष्ट इशारा दिला आहे.

**'बहुतां छंदांचे बहु असे जन । नये वाटूं मन त्यांच्या संगें ॥'**
**'करावा जतन आपुला विश्वास'।**

आत्मचरित्रांत त्यांनीं 'लोक-मतापासून' अलग राहणें हें एक साधन सांगितलें आहे.

**सत्या-असत्यासि मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहु-मता ॥**

---

[३३]

नाम-संकीर्तन साधन पैं सोपें ।
जळतील पापें जन्मांतरें ॥ १ ॥
न लगती सायास जावें वनांतरा ।
सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥
ठाईं च बैसोनि करा एक-चित्त ।
आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥
राम कृष्ण हरि विठ्ठल केशवा ।
मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥
याविण आणिक असतां साधन ।
वाहतसे आण विठोबाची ॥ ५ ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि ।
शाहणा तो धणी घेतो येथें ॥ ६ ॥

नाम-स्मरण हें सोपें साधन आहे. आणि जन्मजन्मांतरांतलीं सर्व पापें भस्म करण्याचें त्यांत सामर्थ्य आहे. त्याला कांहीं सायास लागत नाहींत कीं कोठें जावें-यावें लागत नाहीं. घरवसल्या नारायण चालून येतो. एके ठिकाणीं बसून चित्त एकाग्र करावें आणि प्रेमाच्या जिव्हाळ्यानें प्रभूला आळवावें. ईश्वराच्या अनंत नामांचा सर्वकाळ ध्यास घ्यावा. ह्याशिवाय दुसरें साधन नाहीं, हें मी—तुकाराम महाराज म्हणतात—विठोबाची शपथ घेऊन सांगतों. सर्व साधनांपेक्षां हें सोपें आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन शाहणा मनुष्य नाम-सुखाचा लाभ घेतो.

तुकाराम महाराजांच्या साधनपर अभंगांपैकीं हा एक निकराचा अभंग आहे. उपास्य देवतेची शपथ घेऊन महाराजांनीं ह्यांत प्रतिज्ञा मांडली आहे.

ह्यांत खालील विधानें आहेत:—

(१) नाम-स्मरण हें सोपें साधन आहे.

**‘नाम घेतां न लगे मोल। नाम मंत्र नाहीं खोल।**
**दों चि अक्षरांचें काम। उच्चारावें राम राम॥’**
**‘सोपें हें साधन लाभ येतो घरा।**
**वाचेसीं उच्चारा राम हरि॥’**
**‘सुखाचें फुकाचें सकळांचें सार।**
**तरावया पार भव-सिंधु॥’**
**‘स्वल्प वाटे चला जाऊं। वाचे गाऊं विठ्ठल॥’**
**‘विठोवाचें नाम सुलभ सोपारें।**
**तारी एकसरें भव-सिंधु॥’**
**‘बहु चांगलें नाम या राघवाचें।**
**अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें’॥—समर्थ**

(२) नामस्मरण हें एक च खरें साधन आहे. म्हणजे बाकीचीं साधनें ह्याच्या मदतीशिवाय लंगडीं आहेत.

**‘नामा परतें साधन नाहीं।**
**जें तूं करिसी आणिक कांहीं॥’**
**‘तुका म्हणे मज आणिक उपाय।**
**दिसती ते वाव नामें विण॥’**
**‘नामा म्हणे तया आणिक साधन।**
**ऐसें हें वचन बोलों नये॥’**

(३) नाम-स्मरण हें स्वतंत्र साधन आहे. म्हणजे त्याला इतर साधनांच्या मदतीची अपेक्षा नाहीं.

**‘न लगे सांडणें मांडणें। आगम-निगमांचें देखणें॥**
**अवघें तुका म्हणे। विठ्ठल-नामें आटलें॥’**

**'न लगे लौकिक सांडावा व्यवहार ।**
**घ्यावें घनांतर भस्म-दंड ॥'**
**'भस्म दंड न लगे काठी । तीर्था आटी भ्रमण ॥'**
**'तपाचे सायास । न लगे घेणें वन-वास ।'**
**'उपास पारणें न लगे वन-सेवन ।**
**न लगे धूम्रपान पंचाग्नि तापणें ॥'**

(४) नामस्मरण हें अत्यंत परिणामकारक साधन आहे. ह्यानें अनंत जन्मींचें पाप नाहींसें होऊन नारायण घरीं चालून येतो.

**'मुखीं नाम हातीं मोक्ष ।**
**ऐसी साक्ष बहुतांसी ॥'**
**'चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां ॥**
**तुज पाप चि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळीं वसे ॥'**
**'उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा ।**
**तुटती यातना गर्भवास ॥'**
**'तुटे भव-रोग । संचित क्रियमाण भोग ।**
**ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥'**

(५) हें साधन कसें अंमलांत आणावें ह्याविषयीं तीन मुद्दे आहेत:

(अ) चित्ताची एकाग्रता.

**'बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त ।**
**तया सुखा अंत-पार नाहीं ॥**
**येऊनि अंतरीं राहील गोपाळ ।**
**सायासाचें फळ बैसलिया ॥**
**राम कृष्ण हरि मुकुंद मुरारि ।**
**मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥'**
**'नये वाटूं मन । कांहीं न देखावें भिन्न ॥'**

'न लगे देश काळ। मंत्र विधानें सकळ।
मन चि निश्चळ। करुनी करुणा भाकावी॥'

(आ) प्रेमाचा जिव्हाळा.

प्रेम तेथें वास करी। मुखीं उच्चारितां हरि॥
प्रेमें यावें तया गांवा। चोजवीत या वैष्णवां॥

(इ) सातत्य.

'सर्व काळ वाचे उच्चारितां हरि।
तया सुखा सरी पार नाहीं॥'
'आठहि प्रहर। बारा मास निरंतर॥'
'आपुलाले तुम्ही करा रे स्व-हित।
वाचे स्मरा नित्य राम राम॥'
'पाय विठोबाचे चित्तीं। असों द्यावे दिवस-राती॥'
'अनन्य-चेताः सततं यो मां स्मरति नित्यशः।
तस्याहं सुलभः पार्थ नित्य-युक्तस्य योगिनः॥' —गीता

[३४]

पराविया नारी माउलीसमान ।
मानिलिया धन काय वेंचे ॥ १ ॥
न करितां परनिंदा परद्रव्य-अभिलाष ।
काय तुमचें यास वेंचे सांगा ॥ २ ॥
बैसलिये ठाईं म्हणतां राम राम ।
काय होय श्रम ऐसें सांगा ॥ ३ ॥
संतांचे वचनीं मानितां विश्वास ।
काय तुमचें यास वेंचे सांगा ॥ ४ ॥
खरें बोलतां कोण लागती सायास ।
काय वेंचे यास ऐसें सांगा ॥ ५ ॥
तुका म्हणे देव जोडे याजसाठीं ।
आणिक ते आटी न लगे कांहीं ॥ ६ ॥

ह्या अभंगांत साधन सांगितलें आहे.

(१–२) ' मातृवत् परदारेषु परद्रव्येषु लोष्ठवत् । '
' पराविया नारी रखुमाईसमान । गेलें हें नेमून ठाईंचेंचि ॥
' परस्त्रिया सदा वहिणी माया । '
' विटाळ तो पर-द्रव्य पर-नारी । येथूनि जो दुरी सोंवळा तो ॥ "
' साधनें तरी हीं च दोन्ही । जरी कोणी साधील
पर-द्रव्य पर-नारी । यांचा धरी विटाळ ॥
देवभाग्य घरा येती । संपत्ति त्या सकळां
तुका म्हणे तें शरीर । घर भांडार देवाचें ॥ '
' पर-द्रव्य पर-नारी । जालीं विषाचिये परी । '

(३) परनिंदा-त्याग—

**‘ पर-उपकारी नेणे पर-निंदा ॥ ’**

परद्वार परद्रव्याभिलाष आणि परनिंदा ह्यांना ज्ञानोबांनीं ‘त्रिकुटी’ म्हटलें आहे. त्रिकुटींतून सुटलेल्या समाजाला त्यांनीं त्रि-दोषांतून मुक्त झालेल्या शरीराची उपमा दिली आहे—

**त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटी फिटलिया नगर ।**
**त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ॥**

(४) रामनाम आणि संतांच्या वचनावर विश्वास—

**‘ मारग में तारन मिले संत राम दोई ।**
**संत सदा सीस उपर राम हृदय होई ॥ ’** —मीराबाई

**‘ नमो तया संत-वचनीं विश्वास । ’**
**‘ संतीं केला अंगीकार । त्यांसि अभिमान थोर ॥**
**कांहीं ठेविलें चरणीं । घेती ते चि पुरवूनि ॥**
**तुका पायवणी । घेऊनियां निराळा ॥ ’**
**‘ नसतां कांहीं संचित । भेटी झाली अवचित ।**
**देवें मिळोनियां भक्त । तुका केलासे सनाथ ॥ ’**

संतांच्या वचनावर विश्वास ठेवला म्हणजे रामनाम सहज च हृदयांत दाखल होतें. कारण संत आणि रामनाम ह्यांचा संबंध अभेद्य आहे.

**संत-चरण रज सेवितां सहज ।**
**वासनेचें बीज जळोनि जाय ॥**
**मग राम-नामीं उपजे आवडी ।** —नामदेव

(५) सत्य-वचन—

**खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरि ।**
**ऐसे फुकाचे उपाय । सांडोनियां वायां जाय ॥**

सत्य निरपवाद असावें—

‘ असत्य-वचन होतां सर्व जोडी ।
जरी लग्न-घडी पर-उपकार ॥ १ ॥
जाईल पतना यासि संदेह नाहीं ।
साक्षी आहे कांहीं सांगतों तें ॥ २ ॥
वदविलें मुखें नारायणें धर्मा ।
अंगुष्ठ त्या कर्मासाठीं गेला ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां सांभाळा रे पुढें ।
अंतरींचें कुडें देईल दुःख ॥ ४ ॥ ’

‘ सत्यं वद ।’ — श्रुति

[३५]

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव ।
आपण चि देव होय गुरु ॥ १ ॥
पढिये देहभाव पुरवी वासना ।
अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ २ ॥
मागें-पुढें उभा राहे सांभाळीत ।
आलिया आघात निवारावे ॥ ३ ॥
योग-क्षेम त्यांचें जाणे जड-भारी ।
वाट दावी करीं धरूनियां ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं ।
पहावें पुराणीं विचारूनि ॥ ५ ॥

माझ्या विठोबाचें प्रेम किती अद्भुत आहे ! आपण च देव, आपण च गुरु हि होतो. आम्हांला जें कांहीं प्रिय असेल—मग ती देहविषयक वासना कां असेना—तें पुरवितो. आणि शेंवटीं आपल्या जवळ घेऊन जातो. मागें-पुढें सांभाळ करण्यासाठीं हजर राहून आमच्यावर येणारे सर्व आघात परभारें नाहींसे करतो. भक्तांचा संसार हि तो चालवितो, आणि परमार्थाचा रस्ता हि त्यांना तो च दाखवितो. तुकाराम महाराज म्हणतात, ज्या मनाला ही गोष्ट पटणार नाहीं, त्यानें पुराणांना पुसावें.

(१) माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव—

**‘प्रियं ब्रह्म’—ईश्वर प्रेमभाव आहे—असें श्रुतीचें वचन आहे.**

**‘माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हाइली ॥ १ ॥**
**कुरवाळूनि लावी स्तनीं । न वजे दूरीं जवळुनी ॥ २ ॥**

केली पुरवी आळी । नव्हे निवुर कोंवळी ॥ ३ ॥
तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥'

'भक्त-करुणा बहु तुझिया अंतरा ।
मज विश्वंभरा कळों आलें ॥
हृदय कोमल तुझें नारायणा ।
ऐसें बहुतां जनां तारियलें ॥
तुका म्हणे सीमा नाहीं तुझे दये ।
कोमल हृदय पांडुरंगा ॥'

(२) आपण चि देव होय गुरु—

तुकोबांना देवांनीं च गुरु-रूपानें आधार दिला हें प्रसिद्ध च आहे.

घालूनियां भार राहिलों निश्चिती ।
निरविलें संतीं विठोबासी ॥
लावूनियां हात कुरवाळिला माथा ।
सांगितलें 'चिंता न करावी' ॥

(३) पढियें देहभाव पुरवी वासना—

पढियें तें आम्हीं तुजपासीं मागावें ।
जीवींचें सांगावें हित-गुज ॥
पाळशील लळे दीन वो वत्सले ।
विठ्ठले कृपाळे जननीयें ॥

(४) अंतीं तें आपणापाशीं न्यावें—

ते मरणाऐली चि कडे । मज मिळोनि गेले फुडे ।
मग मरणीं आणिकीकडे । जातील केंवि ॥ —ज्ञानदेव

(५) मागें-पुढें उभा राहे सांभाळीत—

निर्वाणीं गोविंद असे मागें-पुढें ।
कांहीं च सांकडें पडों नेदी ॥

(६) आलिया आघात निवारावे—

**घेऊनियां चक्र गदा । हा चि धंदा करितो ॥**
**भक्ता राखे पायांपासीं । दुर्जनासी संहारी ॥**

(७) योग-क्षेम त्यांचें जाणें जड-भारी—

**'योग-क्षेमं वहाम्यहम्' 'योग-क्षेमवहो हरिः' इ. वचनें आहेत**
**'पडतां जड भारी । दासें आठवावा हरि ॥**
**मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन**

(८) वाट दावी करीं धरूनियां—

**'कळे न कळे ज्या धर्म । ऐका सांगतों रे वर्म ॥**
**माझ्या विठोबाचें नाम । अट्टहासें उच्चारा ॥**
**तो या दाखवील वाटा । जया पाहिजे त्या नीटा ॥**
**कृपावंत मोटा । पाहिजे तो कळवळा ॥'**
**'जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती ।**
**चालविसी हातीं धरूनियां ॥'**

(९) तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पहावें पुराणीं विचारूनि ॥

**'कृपाळु' म्हणोनि बोलती पुराणें ।**
**निर्धार वचनें यांचीं मज ॥'**

पण इतक्यावर हि विश्वास नाहीं पटला तर ?

**तुका म्हणे नासी । कुतर्क्यांचे कपाळीं ॥**